


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य पत्रिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. २९९ (दीपावली विशेषांक)
ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००१



***म. सा. प. च्या सर्व सदस्यांना दीपावलीच्या व नववर्षाच्या हार्दिक शुभेच्छा !***

## अनुक्रमणिका





**मुद्रक-प्रकाशक** : ह. ल. निपुणगे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

**मुद्रणस्थळ** : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा, पुणे ४११ ०३०.

**अक्षरजुळणी** : यशश्री एंटरप्रायझेस, २४, ईशदान सोसायटी, अभ्यंकर स्टीलजवळ, पौड फाटा, कोथरूड, पुणे ४११ ०२९. फोन : ५४६०६०२.

**मूल्य** : रुपये ३०/- **वार्षिक वर्गणी संस्थांसाठी :** रु. १००/-

**आजीव सदस्य शुल्क** : रुपये १०००/- **वार्षिक सदस्य शुल्क :** रु. १००/-

**अंक क्र. २९९** : ऑक्टोबर २००१ ते डिसेंबर २००१

*(महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे. या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही. अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिती नेहमीच सहमत असेलच असे नाही.)*

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २९९

**दीपावली विशेषांक**

ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००१



संपादक

प्रा. डॉ. अरविंद वामन कुळकर्णी



**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी :-४४७५९६३

अनुक्रमणिका

❖
# संपादकीय
❖

**म.** सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळातर्फे साहित्यपत्रिकेचा हा २९९ वा-ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००१ चा अंक दिवाळी विशेषांक म्हणून प्रसिद्ध करताना आनंद होतो आहे. ही दिवाळी आणि नूतन वर्ष पत्रिकेच्या लेखकांना, वाचकांना, वर्गणीदारांना आणि जाहिरातदारांना सुखसमृद्धीचे जावो अशी प्रार्थना आहे.

'पत्रिके'चे संपादन हाती घेतल्यापासून एक वेगळा आनंददायी अनुभव येतो आहे तो म्हणजे एकूण अंकाबद्दलच्या प्रतिक्रियांचा. या बाबतीत जसा संपादकाशी संपर्क साधला जातो तसाच परस्पर लेखकांशीही. प्रतिक्रिया अनुकूल-प्रतिकूल अशा दोन्ही प्रकारच्या असतात. अंक काळजीपूर्वक वाचला जातो आहे हे त्यातून लख्खपणे जाणवते. ललित साहित्याला स्थान नसलेल्या 'पत्रिके'ची मोठ्या प्रमाणावर वाचकांकडून घेतली जाणारी दखल निश्चितच हुरूप वाढविणारी आहे. वाचकांचा असा डोळस लोभ कायम टिकावा, अशी प्रार्थना आहे. त्यांच्या ऋणात राहणे 'पत्रिके'ला नेहमीच आवडेल.

तमाम मराठीच नव्हे तर भारतीयांना आनंद व अभिमान वाटेल अशी नुकतीच घडलेली एक घटना म्हणजे मूळच्या भारतीय असलेल्या विद्याधर नायपॉल या इंग्रजीत लेखन करणाऱ्या कादंबरीकारास जाहीर झालेले नोबेल पारितोषिक. आजवरच्या इतिहासात रवींद्रनाथ टागोर यांनाच हे पारितोषिक मिळालेले आहे. त्यांच्यानंतर योगी अरविंद घोष यांचे 'सावित्री' हे महाकाव्य शेवटच्या फेरीपर्यंत पोहोचले. त्यानंतर नायपॉल हे असे तिसरे भारतीय की ज्यांना हा सन्मान मिळाला. गेल्या तीन पिढ्या नायपॉल कुटुंब परदेशात वास्तव्य करीत असले तरी विद्याधर नायपॉल यांना त्याच्या मूळ भारतीय मुळांची (roots) ओढ सतत प्रेरणा देणारी ठरलेली आहे. भारतात त्यांच्या लेखनाविषयी विशेष कुतूहल दाखविले गेलेले नाही हे खरे. पण पस्तीसएक वर्षांपूर्वी त्यांच्या Area of Darkness या ग्रंथाने भारतात मोठी खळबळ माजविली होती हे काहींच्या लक्षात असेलच! म.सा. परिषद अतिशय आनंदाने विद्याधर नायपॉल यांचे अभिनंदन करीत आहे.

ज्यांची जन्मशताब्दी यावर्षी आहे त्या श्री. के. क्षीरसागर आणि य. गो. जोशी या ख्यातकीर्त साहित्यिकांवरील दोन लेख या अंकात वाचकांना वाचायला मिळतील. तसेच नजीकच्या भूतकाळात कालवश झालेले डॉ. व. दि. कुलकर्णी आणि (हैद्राबादचे) डॉ. श्री. रं. कुलकर्णी यांच्याविषयीची कृतज्ञता व्यक्त करणारे दोन लेखही दिलेले आहेत. फक्त व्यंकटेश माडगूळकर यांच्याबद्दलचा लेख वेळेवर हाती येऊ शकला नाही म्हणून देता आला नाही. कुणाहीकडून लेख लिहवून घेणे योग्य वाटत नव्हते. व्यंकटेश माडगूळकर यांच्यावर लिहायचे तर तसाच मातब्बर समीक्षक हवा. ज्यांनी हे काम पत्करले त्यांना अभावितपणे याहून मोठ्या कामात गुंतावे लागले. तेव्हा वाचकांनी माफी करावी. लेख मिळाला की नंतरच्या अंकात प्रसिद्ध करू.

जागतिक समीक्षेच्या पातळीवर नवनवे सिद्धांत जन्माला आले आहेत वा येत आहेत. मराठीत

त्यांच्याविषयी फारसे लेखन आलेले नाही वा होत नाही. असे सिद्धांत आपल्या वाचकांपुढे ठेवण्याचा प्रयत्न करण्याचे अभिवचन मे-जून-जुलैच्या अंकाच्या संपादकीयात दिलेले होते. या अंकात 'वाचक-प्रतिसाद सिद्धांत' हा लेख त्या दृष्टीने पहिले पाऊल ठरावे. वाचकांनी त्याकडे आवर्जून लक्ष द्यावे अशी विनंती आहे.

• 'पत्रिके'चा गेला अंक प्रसिद्ध झाल्यानंतर ख्यातनाम समीक्षक डॉ. श्री. रं. कुलकर्णी (हैद्राबाद), पत्रकार आणि स्वातंत्र्य सैनिक दादासाहेब गणोरकर (औरंगाबाद), लेखक व पत्रकार वा. ना. कुवेर (पुणे), सुप्रसिद्ध गायक रतिलाल भावसार (चिंचवड, पुणे), प्रा. अशोक जोशी (चोपडा-जळगाव), बालसाहित्याचे भीष्माचार्य भा. रा. भागवत आणि नाट्यकलावंत एकनाथ हट्टंगडी (मुंबई), यांचे दुःखद निधन झाले. म. सा. परिषद त्याबद्दल अतीव दुःख व्यक्त करीत आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना सावलीसारखी साथ देणाऱ्या नासिकच्या कर्मवीर दादासाहेब गायकवाड यांचीही जन्मशताब्दी यावर्षी आहे. म. सा. परिषद त्यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन करीत आहे.

शेवटी एका अतिशय उल्लेखनीय वाटणाऱ्या उपक्रमाचा मुद्दाम निर्देश करावयाचा आहे. नासिक जिल्ह्यातील देवळा हे एक ग्रामीण भागातील गाव. तिथल्या 'कर्मवीर रामराव आहेर महाविद्यालया'चे वार्षिक 'बांधिलकी' नुकतेच 'पत्रिके'कडे आले आहे. त्यात गेल्या शंभरेक वर्षातील सर्व वाङ्मय-प्रकारांतील अनेक मराठी लेखकांच्या साहित्यकृतींवरील रसग्रहणात्मक लेख समाविष्ट करण्यात आलेले आहेत. हे सारे विद्यार्थ्यांनी लिहिलेले आहेत. आम्हाला ही बाब उल्लेखनीय यासाठीच वाटते आहे की वाङ्मयाभिरुची आणि वाचन-संस्कृती यांच्या विकसनासाठी टाकले गेलेले हे एक ठोस पाऊल आहे.

अलिकडच्या काळात या दोन्ही महत्त्वाच्या गोष्टींची उपेक्षा होत असल्याबद्दल टाकले जाणारे उसासे सतत कानावर येत असतात. पण त्या बाबतीत निश्चित आराखडा मनाशी पक्का करून या ग्रामीण भागातील देवळा येथील महाविद्यालयानेच काहीतरी कृती केली आहे. वास्तविक हे काम अतिशय जिकीरीचे आहे. चिकाटीने आणि चांगल्या तऱ्हेने ते पार पाडल्याबद्दल तिथले तरुण प्राध्यापक डॉ. एकनाथ पगार जाहीर कौतुकास पात्र आहेत.

साहित्यविश्वाच्या दृष्टीने उपयोगी ठरतील असे नवनवे उपक्रम त्यांनी हाती घ्यावेत, त्यातून इतरांनाही चेतना द्यावी अशी आम्ही त्यांना विनंती करतो. त्यांना हे सर्व करण्याची संधी, स्वातंत्र्य आणि सुविधा उपलब्ध करून दिल्याबद्दल मराठी विभाग प्रमुख डॉ. कमल आहेर आणि प्राचार्य एच.आर. आहेर यांचे अभिनंदन करतो. लेखन केलेल्या सर्व विद्यार्थी-विद्यार्थिनींना खास स्वतंत्र शाबासकी!

इतर नोंदवावे असे विशेष काही नाही. हा अंक सिद्ध करताना नेहमीच्याच सन्मित्रांनी नेहमीप्रमाणे तत्परतेने साथ दिलेली आहे. सर्व कार्यकारी मंडळ, अक्षरजुळणीचे काम करणारे श्री. सदानंद देशपांडे, छपाई करणारे श्री. जंगम आणि जाहिरातदार यांचे आभार मानतो आणि दिवाळीच्या शुभेच्छा पुन्हा एकदा सर्वांना देऊन थांबतो. अस्तु. इति लेखनसीमा—

■

# श्रीकेक्षी : सश्रद्ध माणूस, समर्थ समीक्षक

(जन्म : ६ नोव्हेंबर १९०१ मृत्यू : २९ एप्रिल १९८०)

❑

डॉ. गं. ना. जोगळेकर

❑

श्री. के. क्षीरसागर हे अशा मोजक्या लेखकांपैकी आहेत की ज्यांचे लेखन अनेकदा वाचले किंवा त्यावर जाणकारांशी चर्चा केली तरी त्यांच्या चाहत्यांच्या मनात कुतूहल शिल्लक राहतेच. श्रीकेक्षींना सगळे वाचक समीक्षक म्हणून ओळखतात. पण ते केवळ समीक्षक नाहीत. त्यापेक्षा बरेच काही आहेत. तसे ते समीक्षक आहेत; पण केवळ वाङ्मयाचे नाहीत. वाङ्मयापलीकडच्या जीवनाबद्दल त्यांची जिज्ञासा अपार आहे. त्यामुळे सामान्यत: समीक्षक ज्या प्रकारच्या विषयांकडे वळणार नाहीत अशाही विषयांवर त्यांनी लिहिले आहे. त्यामुळे केवळ समीक्षक नव्हे, तर जीवनाचा विचारवंत भाष्यकार म्हणूनच श्रीकेक्षी आपल्याला जाणवत राहतात.

श्रीकेक्षींना जाऊनही आता वीस वर्षे उलटून गेली. पण कुठलीही राजकीय-सामाजिक घटना घडली की, 'आज अत्रे हवे होते' असे जसे मराठी माणसांना वाटत राहते त्याप्रमाणे वाङ्मयाच्या आणि विचाराच्या क्षेत्रात काही बरेवाईट घडले की 'आज श्रीकेक्षी असते तर ते काय म्हणाले असते' असे त्यांच्या परिचितांच्या मनात आल्याशिवाय राहत नाही. अत्रे अफाट तसे त्यांचे कार्यक्षेत्रही अफाट होते; श्रीकेक्षी त्या मानानें मर्यादित क्षेत्रात वावरलेले, पण सामाजिक प्रतिक्रिया तीव्र शब्दांत मांडण्याचा दोघांचा स्वभाव होता. फरक एवढाच की अत्रे सामान्यांच्या भावना नेमक्या शब्दांत मांडत. श्रीकेक्षी मात्र बहुतेक वेळेला रुढ मताच्या विरूद्ध आपली भूमिका मांडत, पण त्यांचे विवेचन अशा काही बिनतोड युक्तिवादाने भरलेले असे की कुणाही विचारी माणसाला ते डावलता येत नसे.

श्रीकेक्षींचे लौकिक जीवन चारचौघांसारखे असूनही काही बाबतीत वेगळे होते. घरात वडीलधारी माणसे असल्यामुळे श्रीकेक्षींवर कसली घरची जबाबदारी पडली नाही. मोठेपणी थोरल्या बंधूंनी त्यांना सतत आधार दिला, विचारपूस केली. हुशार विद्यार्थ्यांत त्यांची गणना होत असूनही श्रीकेक्षींनी अभ्यासाच्या बाबतीत कसला आटापिटा केला नाही. साताऱ्याच्या सरकारी हायस्कूलमधून ते मॅट्रिक झाले आणि महाविद्यालयातील विद्यार्थी म्हणून ते प्रथम कर्नाटक कॉलेज धारवाड येथे दाखल झाले; मात्र त्यांचे वास्तव्य तेथे काही महिन्यांपुरते होते. बरोबरीचे जे कन्नड भाषी विद्यार्थी होते ते मराठी माणसांचा द्वेष करीत; त्यांना नावे ठेवीत हे त्यांच्या अनुभवास आले. श्रीकेक्षी फर्ग्युसनमध्ये आले आणि इंग्रजी-मराठी विषयांत त्यांना बी.ए.ची पदवी मिळाली. काही काळ वकिलीच्या अभ्यासक्रमाकडे ते वळले पण वकील काही झाले नाहीत. एम.ए.चा अभ्यास करावा असेही त्यांना कधी वाटले नाही. त्यामुळे ते शेवटपर्यंत फक्त बी.ए.च राहिले. काही वर्षे बेकारीत गेल्यावर श्रीकेक्षी भावे स्कूलमध्ये



अनुक्रमणिका

शिक्षक म्हणून काम करू लागले. (कधी अर्धवेळ, कधी पूर्णवेळ) आणि याच संस्थेच्या महाविद्यालयातून ते मराठीचे प्राध्यापक म्हणून निवृत्त झाले. त्या काळात बी.टी./बी.एड. असणे बंधनकारक नव्हते. त्यामुळे त्या वाटेलाही ते कधी गेले नाहीत. विद्यार्थीदशेपासून श्रीकेक्षींना वाचनाचे व्यसनच होते. चांगल्या योग्यतेची इंग्रजी-मराठी पुस्तके ते सतत वाचत असत. (वाचलेल्या पुस्तकांमध्ये ठिकठिकाणी खुणा करण्याची, तिथल्या तिथे स्वत:ची प्रतिक्रिया लिहून ठेवण्याची त्यांना सवय होती.)

श्रीकेक्षी १९२८ ते १९४५ या सतरा वर्षांत भावे स्कूलमध्ये शिक्षक होते आणि १९४५ ते १९६२ ही सतरा वर्षे ते त्याच संस्थेच्या एम.ई.एस. कॉलेजमध्ये प्राध्यापक होते. शिक्षक असताना त्यांनी आपले कर्तृत्व सिद्ध केले आणि प्राध्यापक असताना त्यांना सगळे मानसन्मान मिळत गेले. बी.ए. व्हायचे आणि मिळेल त्या शाळेत शिक्षकाची नोकरी करायची हा त्या काळात एक रूढ मार्ग होता. वि. वि. बोकील, ग. ल. ठोकळ हेही शिक्षक पण कथा-कादंबरी यांत ते रमले. श्रीकेक्षींनी मात्र रूढ प्रकारचे ललितलेखन फारसे केलेले नाही. शाळेतील संमेलनप्रसंगी करण्यासाठी त्यांनी काही नाटिका लिहिल्या आणि अधूनमधून काही कथांची निर्मितीही त्यांनी केली. (कालांतराने या कथा 'सेतुपार्वती' या संग्रहात समाविष्ट करण्यात आल्या.) ललित लेखक म्हणून श्रीकेक्षींचे नाव कुणी घेतलेही नसते. पण १९४० मध्ये वेगळ्या वळणाची 'राक्षसविवाह' ही कादंबरी त्यांनी लिहिली, त्यामुळे कादंबरीकार ही त्यांची प्रथमच प्रतिमा निर्माण झाली. (मर्ढेकरांनी केलेल्या कडक टीकेमुळे ही कादंबरी अधिकच गाजली.) श्रीकेक्षी प्रामुख्याने करू लागले ते वैचारिक लेखन आणि या क्षेत्रात मात्र त्यांचा दबदबा दोन-चार लेखांतच सुरू झाला. त्र्यंबक शंकर शेजवलकर यांच्या 'प्रगति' साप्ताहिकात श्रीकेक्षी नियमितपणाने लिहू लागले आणि त्यांच्या चौफेर व्यासंगाची वाचकांना कल्पना येऊ लागली. १९२८ मध्ये एक होतकरू शिक्षक म्हणून त्यांनी भावे स्कूलमध्ये प्रवेश केला आणि १९६२ मध्ये आघाडीचे समीक्षक, (श्रीकेक्षींच्या मते 'सर्वश्रेष्ठ' समीक्षक) साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, सौंदर्यवादी भाष्यकार म्हणून ते निवृत्त झाले. ही सगळी कमाई श्रीकेक्षींनी परिस्थितीशी आणि प्रकृतीशी झगडत संपादन केली होती.

माधवराव पटवर्धन (कवी माधव जूलियन) यांच्याशी श्रीकेक्षींचे विशेष सख्य होते. त्यांच्या कवितांचे श्रीकेक्षी नि:सीम चाहते होते. माधवराव पुण्यात असेपर्यंत त्यांच्या आणि श्रीकेक्षींच्या नेहमी गाठीभेटी पडत. माधवरावांमुळे रविकिरण मंडळातील अन्य लेखकांचाही त्यांचा परिचय वाढला. पण खास श्रीकेक्षींचे असे जे मित्र होते त्यात भय्यासाहेब उमराणी, गोपीनाथ तळवलकर आणि गं. भा. निरंतर इत्यादी प्रमुख होते. या सर्वांना कवितेची आवड, इंग्रजी-मराठी पुस्तकांच्या वाचनाचे वेड असल्यामुळे त्यांच्या मैफली रंगत. राजकीय मतभेदांमुळे वादविवादही झडत आणि टिंगलटवाळी करण्यातही कुणी हार जात नसे. माधवरावांच्या फारसी-पांडित्याचा श्रीकेक्षींना फार फायदा झाला. त्यांना मराठीपेक्षाही उर्दू कविता अधिक वेधक वाटत असे. गालिब, मीर, दाग, जोश मलीहाबादी अशा ख्यातनाम शायरांच्या रचना श्रीकेक्षींना केवळ आवडत असत असे नव्हे तर त्या मुखोद्गतही असत. ध्वनिमुद्रिका ही त्या

काळात नवलाई होती. त्यामुळे गोहरजान, अख्तरीबाई (बेगम अख्तर), बाई सुंदराबाई, जोहराबाई अंबालावाली अशा अनेक गायिकांच्या गजलांच्या ध्वनिमुद्रिका तास न् तास ऐकणे हाच त्यांचा विरंगुळा होता. ज्या सौंदर्यवादाचा श्रीकेक्षींनी आयुष्यभर ध्यास घेतला होता, त्याचे नेमके दर्शन त्यांना उर्दू-फारसी कवितेतून घडत असे. फार थोड्या मराठी समीक्षकांना इंग्रजी-मराठीखेरीज अन्य भारतीय भाषांतील साहित्यात गती असते. एकोणिसाव्या शतकातील ठरावीक इंग्रजी कवी हेच काय ते रोमँटिक कवी असे श्रीकेक्षी मानत नसत. त्यामुळे त्यांनी आपल्या टीका-लेखांत इंग्रजीपेक्षा उर्दू-फारसी काव्यातील अवतरणे अधिक प्रमाणात दिलेली दिसतात. चांगले अवतरण सिनेमातले असले तरी ते उद्धृत करीत. 'माझे पहिले प्रेम अर्थात गझल' या गाजलेल्या लेखात त्यांनी 'अंदाज' चित्रपटातील 'यूँ तो आपसमें बिगड़ते हैं खपा होते हैं।'' या मजरूह सुलतानपुरीच्या कवितेचा आधार घेतलेला दिसेल. परंपरागत संस्कृत काव्यशास्त्र आणि संकेतप्रधान संस्कृत काव्य यापासून मात्र श्रीकेक्षी दूरच राहिलेले दिसतात.

साहित्य विश्वातील त्यांची इतर श्रद्धास्थानेही वेगळी होती. माधवरावांप्रमाणे केशवसुत आणि तांबे यांच्या कवितेतही सौंदर्यवादाचे दर्शन घडते म्हणून हे कवी श्रीकेक्षींना प्रिय होते. त्यांच्या मते केशवसुत हे कवी क्रांतिकारक खरे; पण 'अमूक इतक्या नवीन गोष्टी त्यांनी मराठी काव्यात प्रथमच आणल्या' यापेक्षा त्यांच्या आत्म्याची खूण त्यांच्या कवितांमध्ये दिसते म्हणून ते क्रांतिकारक ठरतात. (श्रीकेक्षींना बालकवींचे आकर्षण मात्र वाटलेले दिसत नाही!) गद्य लेखकांत इतिहासाचार्य राजवाडे आणि हरिभाऊ आपटे यांच्या साहित्याचे श्रीकेक्षी चाहते होते. पण ज्ञानकोशकार डॉ. केतकर हे त्यांचे खरे श्रद्धास्थान होय. केतकरांबद्दल त्यामुळेच त्यांनी वेळोवेळी लिहिले. केतकरांची खरी योग्यता मराठी माणसांनी ओळखली नाही, याबद्दल त्यांना वैषम्य वाटे. आहिताग्नि शंकर रामचंद्र राजवाडे यांच्याबद्दलही श्रीकेक्षींना विशेष आदर वाटे. सर्वगामी पांडित्य, वादपटुत्व, स्वतंत्र विचारशक्ती आणि चाकोरीबाहेरील मते यामुळे आणि निर्भीड विवेचनशक्तीमुळे आहिताग्नि राजवाडे यांच्याशी होणाऱ्या संभाषणात काहीतरी अपूर्व प्राप्ती झाली असे त्यांना वाटत असे. खरीखुरी 'रोमँटिक ट्रॅजिडी' (एकच प्याला) मराठीला देणारा नाटककार म्हणून गडकरी त्यांना प्रिय होते. तोपर्यंत मराठी साहित्यातील मान्यताप्राप्त अशा विष्णुशास्त्री चिपळूणकर, आगरकर, कोल्हटकर, केळकर, फडके, खांडेकरांबद्दल त्यांना विशेष काही वाटत नसे. याउलट लोकहितवादी यांच्या शतपत्रांची आणि लोकमान्य टिळकांच्या अस्सल मराठी शैलीची ते तारीफ करीत.

मराठी साहित्य-सृष्टीत विशेषतः समीक्षेच्या क्षेत्रात त्या काळात काही पाश्चात्य लेखकांचा फार दबदवा होता. डॉ. जॉन्सन, हडसन, रिचर्डस, टी एस ईलिएट यांच्या आधाराशिवाय मराठी समीक्षेचे पान हलत नसे. मार्क्स आणि फ्रॉइड ही तर अनेकांची दैवतेच होती. श्रीकेक्षी यांनी या सर्वांचे वाचन केले होते पण यातला कुणी त्यांना आदर्श म्हणून स्वीकारावासा वाटला नाही. याउलट, तोपर्यंत फारसा कुणाला माहीत नसलेला जर्मन विचारवंत नीत्शे हा त्यांना जवळचा वाटे. हा नीत्शे बंडखोर विचारवंत म्हणूनच प्रसिद्ध होता. येशू ख्रिस्त आणि त्याचा धर्म यांनाही तो जुमानीत नसे. यावरून त्याच्या बंडखोरीची कल्पना येण्यासारखी आहे. स्त्री

आणि पुरुष यांच्यामधील समानता त्याला मुळीच मान्य नव्हती. पुरुषांचे वर्चस्व राहणारच कारण निसर्गाची योजनाच तशी आहे असे त्याला ठामपणे वाटत असे. श्रीकेक्षींचे विवेचनही काही वेळा नीत्शेसारखेच भासते यात शंका नाही.

केवळ पाश्चात्य साहित्याकडे नजर ठेवून श्रीकेक्षी कधीच वावरले नाहीत. थोर बंगाली लेखक रवीन्द्रनाथ आणि शरदबाबू यांच्या साहित्याचे ते विशेष चाहते होते. श्रीकान्त, चरित्रहीन, शेषप्रश्न, गृहदाह, देवदास यँसारख्या शरदबाबूंच्या कादंबऱ्या भारतीय साहित्याची भूषणे होत; खरी भारतीय स्त्री शरदबाबूंनाच दाखविता आली, असे श्रीकेक्षींना वाटे. राष्ट्रकवी रवीन्द्रनाथांच्या कविता त्यांना आवडतच, त्यातला गूढवाद आणि कलात्मकता विशेष आकर्षक वाटे. पण रवीन्द्रनाथ म्हणजे केवळ कवी नव्हेत. त्यांच्या कथा, कादंबऱ्या, नाटके इतकेच नव्हे तर त्यांचे बालवाङ्मयही प्रभावी आहे, त्यामुळे ते परिपूर्ण लेखक ठरतात. पण मुळामध्ये तत्त्वचिंतक म्हणून त्यांचे स्थान असामान्य आहे. शरदबाबू आणि रवीन्द्रनाथ यांच्याबद्दल लिहिताना श्रीकेक्षींच्या मनातील कृतज्ञता दाटून आली आहे असे जाणवते. एरवीचे आक्रमक श्रीकेक्षी येथे अगदी नम्र झालेले दिसतात. विवेकानंद आणि योगी अरविंद यांच्याबद्दल लिहीत असतानाही श्रीकेक्षींची मन:स्थिती भारलेल्या साधकाची वाटते. मात्र भावडेपणाने या थोरांचे गुणगान करण्यापेक्षा त्यांच्या कार्याचे वेगळेपण जाणले पाहिजे हे सांगण्यावर श्रीकेक्षींचा भर असे. जे. कृष्णमूर्ती हे तर श्रीकेक्षींना महापुरुषच वाटत. त्यांचे सर्वस्पर्शी तत्त्वज्ञान, शुद्ध आचरण, उत्कृष्ट वक्तृत्व आणि शैलीदार इंग्रजी याबद्दलही श्रीकेक्षींनी भरभरून लिहिले आहे. उत्तरायुष्यात श्रीकेक्षी अधिकाधिक अध्यात्मप्रधान साधकांकडे किंवा गुरूंकडे आकृष्ट झालेले दिसतात. धुंडिराजशास्त्री विनोद यांनी रूढ केलेले गुरूपूजन, आचार्य रजनीशांच्या संप्रदायातील आसक्तीतून अनासक्तीकडे जाण्याचे वेगळेपण आणि अवतार मेहेरबाबा यांचे मौनरूप जीवनचिंतन या सगळ्यांचे श्रीकेक्षींना आकर्षणच नव्हे तर महत्त्व वाटत असे. आचार्य रजनीश हे अनेक बुद्धिवादी विचारवंतांच्या दृष्टीने 'जनतेला झुलवणारा आणखी एक बुवा' असले तरी श्रीकेक्षींना तसे कधी वाटले नाही. सौंदर्यवाद आणि वास्तववाद यांचे पर्यवसान शेवटी गूढवादात होते ही त्यांची प्रिय भूमिका होती. त्याप्रमाणे जीवनाच्या वाटचालीचाही शेवट आध्यात्मिक गूढतेत होतो असा त्यांचा विश्वास होता. श्रीकेक्षींच्या उत्तरकालातील विचारांबद्दल मतभेद होऊ शकतील. पण जे मन:पूर्वकतेने जाणवले ते त्यांनी प्रामाणिकपणे मांडले हे नाकारता येत नाही.

विद्येच्या आणि विचाराच्या क्षेत्रात रमलेले श्रीकेक्षी लोकांना ठळकपणे माहीत झाले ते त्यांनी सावरकर आणि माधवराव पटवर्धन यांच्या भाषाशुद्धीच्या मतांच्या एकदम विरोधी भूमिका घेऊन लिहिलेल्या कडक लेखांमुळे. १९२३ मध्ये अंदमानहून सावरकरांना इंग्रज सरकारने रत्नागिरीला आणून स्थानबद्ध केले होते. (तेथे ते १९३७ पर्यंत होते.) कोणतीही राजकीय हालचाल करायची नाही असे त्यांच्यावर बंधन होते. त्यामुळे राजकारण सोडून अन्य विषयांवर लिहायचे असे सावरकरांनी ठरविले. आपल्या समाजव्यवस्थेवर विज्ञाननिष्ठ भूमिकेतून कठोर टीका करणारे त्यांचे अनेक लेख 'किर्लोस्कर' मासिकातून प्रसिद्ध होत असत. देशभक्त

सावकरांना मराठीत इंग्रजी आणि फारसी शब्दांची झालेली गर्दी फार खटकत असे. आपली भाषा शुद्ध केली पाहिजे असे त्यांच्या मनाने घेतले आणि 'केसरी' मधून 'मराठीची भाषाशुद्धी' या शीर्षकाची एक लेखमाला १९२६ मध्ये लिहिली. (त्याची नंतर पुस्तिकाही प्रकाशित झाली.) सावरकरांना मानणारा एक मोठा वर्ग समाजात होता. त्यामुळे या भाषाशुद्धीचा प्रसार झपाट्याने होऊ लागला. सावरकरांची भाषाशुद्धी हिंदुत्वावर आधारलेली होती. इस्लामी आक्रमणानंतर आपल्या भाषांमध्ये हजारो अरबी-फारसी शब्द घुसले आहेत ते काढून टाकून तेथे संस्कृतनिष्ठ शब्दांची प्रतिष्ठापना केली पाहिजे. आपल्या भाषेत तारीख, जागा, जमीन, हवा, गरीब, लढाई, कुस्ती, खुराक, यांसारखे इतके परकीय शब्द आहेत की ते परकीय आहेत हेच आपल्याला जाणवत नाही. या शब्दांच्याऐवजी अनुक्रमे दिनांक, स्थान, भूमी, वायू, दीन, युद्ध, नियुद्ध, खाद्य असे सुसंस्कृत शब्द वापरले पाहिजेत. (सावरकरांनी या पुस्तिकेच्या शेवटी 'बहिष्कार्य' शब्दांची एक विस्तृत सूचीच जोडली होती.)

माधवराव पटवर्धन हे मुळात फारसी-पंडित म्हणून प्रसिद्ध होते. त्यांच्या कवितेमध्ये अनेक फारसी शब्द येत असत. इतके की, या बेंगरूळ भाषेचे विडंबन करून अत्र्यांनी आपली 'झेंडूची फुले' फुलवली. कालांतराने माधवरावही स्वकीय तेच स्वीकारले पाहिजे आणि परकीय ते टाकले पाहिजे या मताचे बनले. यासाठी त्यांनी स्वत:पासूनच सुरुवात केली. आपल्या कवितांमधील परकीय शब्दांच्या जागी निव्वळ मराठी शब्द योजण्यास सुरुवात केली. (माधवरावांनी आपल्या कविता 'रफू' केल्या असे यावर श्रीकेक्षी म्हणत असत.) मराठीतील इंग्रजी आणि फारसी शब्द काढून टाकले पाहिजेत असे त्यांनाही वाटत होते. मात्र मुद्दाम दुर्बोध, संस्कृत शब्द आणण्यापेक्षा मुळातले मराठीच पण काळाच्या ओघात विसरले गेलेले मराठी शब्दच आणले पाहिजेत या विचाराने त्यांनी भराभर असे मराठी शब्द सुचविले. कुस्ती नको, नि युद्धही नको. त्याऐवजी 'झोंबी' शब्द आणा. जमीन-भूमी याऐवजी भुई, बेरीजच्या जागी मिळवणी, कमीच्या जागी न्यूनही नको तर उणे म्हणा असे सांगत त्यांनीही शुद्ध शब्दांचा एक कोश केला. (तो त्यांच्या 'भाषाशुद्धिविवेक' या पुस्तकात शेवटी जोडला आहे.) आपले १९३६ चे साहित्य संमेलनाचे अध्यक्षीय भाषण भाषाशुद्धी-विचार मांडण्यासाठी आणि पटवर्धनी शब्दांचा सर्वत्र उपयोग करून त्यांनी केले आहे.

श्रीकेक्षींना सावरकर-पटवर्धनांची भाषाशुद्धीसंबंधीची भूमिका मुळीच मान्य नव्हती. 'खरी भाषाशुद्धी आणि तिचे खरे वैरी' या शीर्षकाने त्यांनी त्या वेळच्या 'सह्याद्रि' मासिकातून लेख प्रसिद्ध करून या वादाला तोंड फोडले. या वेळी सावरकर या वादात उतरले नसले तरी माधवरावांनी मात्र आपली बाजू हिरीरीने मांडली. उत्तरे-प्रत्युत्तरे हा क्रम पाच-सहा महिने चालला, सावरकर-पटवर्धन मराठीचे स्वाभाविक रूप बिघडवत आहेत आणि विद्रूप शब्दनिर्मिती करीत आहेत. जे फारसी शब्द अनेक शतकांपासून मराठीत रुळून गेले आहेत. ते काढून टाका म्हणण्यात काही अर्थ नाही. 'रेकॉर्ड ब्रेक'साठी उच्चांक 'मोडणे', क्रोकोडियल टियर्स साठी 'नक्राश्रू', गोल्डन मीनसाठी 'सुवर्णमध्य' अशी शब्दाला शब्द ठेवून केलेली भाषांतरे म्हणजे मूळ इंग्रजी शब्दांचीच आठवण करून देणे होय. गुड मॉर्निंगसाठी सरळ नमस्कार किंवा

रामराम म्हणायचे सोडून 'सुप्रभात' म्हणणे ही स्वत्व टिकविण्याची केविलवाणी धडपड होय. नेकटाय तर लावायचा आणि त्याला 'गळपट्टी' म्हणायचे, यासारखा हास्यास्पद प्रकार दुसरा नसेल. (हा शेवटचा टोला माधवरावांना होता, कारण ते पूर्ण पाश्चात्य पोषाखात वावरत असत!) 'प्रत्यवाय' हा संस्कृत शब्द, 'हरकत' हा फारसी शब्द, आणि 'आडकाठी' हा मराठी शब्द असे तिन्ही प्रचारात असले म्हणून बिघडले कुठे? आणि मुख्य म्हणजे शब्द हे भाषेचे एक अंग झाले. सावरकर-पटवर्धन समग्र भाषेबद्दल विचार न करता केवळ 'शुद्ध' शब्दांची भेंडोळी वाचकांपुढे टाकत आहेत. एकंदरीने या वादविवादामुळे भाषाशुद्धी झाली असे म्हणता येत नसले तरी भाषेच्या स्वाभाविक रूपाबद्दल वाचकांच्या मनात उत्सुकता निर्माण झाली हे निश्चित. ''बाकी सगळ्या बाबतीत सुधारणा झाली पाहिजे हे आग्रहीपणाने सांगणारे, भाषेच्या बाबतीत मात्र जुन्या आजीबाईसारखे शब्दांचे सोवळे सांभाळत आहेत.'' अशा खोचक विधानांमुळे भाषाशुद्धीचा आग्रह धरणाऱ्यांना नंतर सौम्य भूमिका घ्यावी लागली.

या वाग्युद्धामुळे ''कुणाचाही मुलाहिजा न ठेवता बिनतोड युक्तिवाद करणारा आक्रमक टीकाकार'' अशी श्रीकेक्षींची प्रतिमा निर्माण झाली. पण यामुळेच त्यांनी एक आपत्ती ओढवून घेतली. त्या काळात महाराष्ट्रात तरुण, तडफदार, आक्रमक शैलीचे वक्ते म्हणून कम्युनिस्ट पक्षाचे संस्थापक भाई डांगे तरुण वर्गात बरेच प्रिय होते. शिक्षित वर्गात मार्क्सवादाचा प्रचार ते प्रयत्नपूर्वक करीत. लालजी पेंडसे, एस.के. लिमये, वा. ना. देशपांडे, प्रभाकर पाध्ये, ह. रा. महाजनी, दि. के. बेडेकर हे सर्व मार्क्सवादी बनले होते. इतकेच नव्हे तर, एस. एम. जोशी, ना. ग. गोरे हे काँग्रेसमध्ये असूनही मार्क्सवादाने प्रभावित झाले होते. सावरकरांसारख्या स्वातंत्र्यवीरालासुद्धा न जुमानणारा हा तरुण आपल्या कामात उपयुक्त ठरेल या कल्पनेने भाई डांगे यांनी श्रीकेक्षींना घेरले. गॉर्की या थोर रशियन लेखकाच्या जन्मशताब्दी-निमित्ताने पुण्याच्या गोखले हॉलमध्ये एक सभा घेण्यात आली होती. त्या वेळी कम्युनिस्ट पुढाऱ्यांबरोबर श्रीकेक्षींनाही व्यासपीठावर स्थान होते. आपल्याला पक्षकार्यासाठी वापरून फायदा तेवढा करून घ्यायचा आहे हे श्रीकेक्षींनी ओळखले हेते. डांग्यांचे शैलीदार फर्ड्या इंग्रजीत भाषण सुरू झाले. ते रशियातल्या कम्युनिस्ट राजवटीची भलावण करू लागले. हे सगळे न पटून श्रीकेक्षींनी व्यासपीठावरून ''आपण आज लेखक गॉर्कीचे स्मरण करण्यासाठी येथे जमलो आहोत; तुमची कम्युनिझम-प्रशस्ती ऐकण्यासाठी नाही'' असे इंग्रजीतच डांग्यांना बजावले. भाई डांग्यांना असे काही कोणी आपल्याला अडवील असे वाटले नव्हते. ते चपापले आणि त्यांनी आपले भाषण लगेच आवरते घेतले. या माणसाला जवळ करण्यात काही अर्थ नाही, हे अनुभवी डांग्यांनी ताडले. श्रीकेक्षी पुन्हा म्हणून कधी राजकीय व्यासपीठाकडे फिरकले नाहीत. अगदी संयुक्त महाराष्ट्राची मागणी न्याय्य आहे हे दिसत असूनही त्या चळवळीपासून ते दूर राहिले. मिरजेच्या साहित्य संमेलनात (१९५९) अध्यक्षपदावरून बोलताना केवळ तात्त्विक दृष्टीने त्यांनी भाषिक समस्येचा ऊहापोह केला.

१९४० मधील 'राक्षसविवाहा'चे अपेक्षित स्वागत झाले नाही. त्यामुळे केवळ ललितलेखन हा आपला मार्ग नव्हे असे श्रीकेक्षींनी मानले असावे. कारण नंतर 'बायका' हा ललितलेखांचा

आणि 'वादेवादे' हा ललित निबंधाचा संग्रह त्यांनी प्रकाशित केला तेवढाच. 'उमरखय्यामाची फिर्याद' हा रोमँटिक वृत्तीने लिहिलेला 'काव्यात्म टीकेचा संग्रह' असला तरी त्यात टीकाकार श्रीकेक्षींचे वृत्तिविशेष प्रकट झाल्याशिवाय राहात नाहीत.

श्रीकेक्षींचे बहुतेक सर्व लेखन 'स्फुट लेखांचा संग्रह' या स्वरूपात वाचकांपुढे आले आहे. 'व्यक्ति आणि वाङ्मय', 'वाङ्मयीन मूल्ये' हे आधीचे आणि 'वादसंवाद', 'साहित्याच्या दरबारात', 'केशवसुत आणि तांबे', 'सुवर्णतुला', 'सागरमंथन' हे नंतरचे, यातला कुठलाही संग्रह दुर्लक्षिण्यासारखा नाही. 'मराठी भाषा: वाढ आणि बिघाड' हा अलीकडचा संग्रह म्हणजे श्रीकेक्षींनी वेळोवेळी लिहिलेल्या लेखांचे संकलन आहे. याखेरीज त्यांनी कारणपरत्वे काही पुस्तकांचे विद्यापीठीय अभ्यासक्रमासाठी संपादन केले. चिपळूणकरांचे 'तीन निबंध' संपादित करताना त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचे मोठेपणच त्यांनी अभ्यासकांपुढे मांडले. आपले व्यक्तिगत रागलोभ त्यांनी येथे दूर ठेवले. हा त्यांचा 'टीका-विवेकच' म्हणता येईल.

श्रीकेक्षींचे समीक्षा-लेखन न्याहाळताना असे जाणवते की त्यांच्या प्रारंभीच्या लेखनातही व्यासंग, स्वतंत्र विचार आणि ठशीव मांडणी हे गुण आहेत. पुष्कळ लेखकांचे सुरुवातीचे लेखन प्राथमिक अवस्थेतले अर्धेकच्चे असू शकते. पण श्रीकेक्षींनी सामान्यत: पस्तिशीत लेखन सुरू केले. त्यामुळे असेल, त्यांच्या लेखनात परिपक्वता पहिल्यापासून आढळते. अमूक एक विषय ठरवूनच श्रीकेक्षींनी समीक्षा-लेखन केले असे म्हणता येत नाही. ज्यावेळी जे वाङ्मयीन प्रश्न उद्‌भवले त्याबद्दल काही सांगण्यासारखे असेल तर श्रीकेक्षींनी लिहिले. त्यांच्या विविध प्रकारच्या वाचनाने आणि अभ्यासाने त्यांना अनेक विषयांवर लिहिण्यास प्रवृत्त केले. त्यामुळेच त्यांनी समीक्षकांच्या रूढ मार्गाचे अनुसरण केलेले नाही असे दिसते. प्राचीन मराठी वाङ्मय, संत काव्य, महानुभाव साहित्य, पंडिती काव्य, शाहिरी वाङ्मय, एकोणिसावे शतक, प्रबोधनाचे युग, आधुनिक मराठीतील विविध वाङ्मयीन प्रकार अशा रूढ विषयांकडे श्रीकेक्षी वळलेले दिसत नाहीत. याचा अर्थ हे विषय त्यांनी हाताळलेच नाहीत असे नव्हे. हाताळले, पण ते अप्रत्यक्ष रीतीने. न्या. रानडे, लोकहितवादी अशा विषयांवर लिहिताना त्या अनुषंगाने त्यांनी एकोणिसाव्या शतकाबद्दल लिहिले पण तेही आवश्यक तेवढेच. जे इतर समकालीन समीक्षक होते त्यांच्यापेक्षा श्रीकेक्षींचे लेखन यामुळेच वेगळे ठरते. 'व्यक्तिपरीक्षण' हा श्रीकेक्षींना विशेष प्रिय असलेला विषय होता. आवडीच्या अशा अनेक व्यक्तींबद्दल कुणी सांगितले म्हणून नव्हे तर स्वत:लाच लिहिल्याशिवाय राहवले नाही म्हणून त्यांनी लिहिले. महाराष्ट्रातील, भारतातील इतकेच नव्हे तर जगातील श्रेष्ठ व्यक्तींच्या कार्यकर्तृत्वाचे दर्शन आणि मूल्यमापन यात श्रीकेक्षी सतत रमलेले दिसतात. विवेकानंद, योगी अरविंद, रवीन्द्रनाथ, म. गांधी, पं. नेहरू, डॉ. राधाकृष्णन, जे. कृष्णमूर्ती, महमद इक्बाल, गालिब अशा कितीतरी व्यक्तींबद्दल लिहिताना त्यांची भूमिका केवळ स्तुतिपाठकाची कधीच नव्हती. 'व्यक्तीचा अभ्यास' यामध्ये जे जे अपेक्षित असते ते श्रीकेक्षी वाचकांपुढे ठेवतातच, पण त्या त्या व्यक्तींचे सुस्पष्ट मूल्यमापनही करतात. श्रीकेक्षींच्या लेखामुळे आपल्याला ती विशिष्ट व्यक्ती नेमकेपणाने समजली अशी वाचकाची प्रतिक्रिया होते. मात्र अशा व्यक्तींची

निवड करण्याचे स्वातंत्र्य श्रीकेक्षींचे असते. गांधी-नेहरूंबद्दल लिहिले म्हणून सरदार पटेल आणि नेताजी यांच्याबद्दलही लिहिलेच पाहिजे असे त्यांनी कधी मानले नाही. हे विषय-निवडीचे स्वातंत्र्य श्रीकेक्षींनी सदैव बाळगले. असे असूनही त्यांचे अनेक लेखसंग्रह नियोजनपूर्वक तयार झाले आहेत. 'वाद-संवाद' आणि 'उमरखय्यामची फिर्याद' ही या प्रकारची वेधक पुस्तके म्हणता येतील. सौंदर्यवादापासून मानवतावादापर्यंत बहुतेक सर्व प्रकारचे वाद श्रीकेक्षींच्या चिंतनाचे विषय झाले आहेत. अशा वादासंबंधी श्रीकेक्षींनीच काय ते लिहिले असे मानण्याचे कारण नाही. बहुतेक सर्व समीक्षक या वादांकडे वळतातच; पण वाद कुठलाही असो त्याच्या विवेचनाला श्रीकेक्षी यांच्या वेगळेपणाचा स्पर्श झालेला असतो. त्यामुळे नेहमीचा विषय असूनही काही तरी वेगळे मिळाले आणि जे मिळाले ते अपूर्व तर आहेच, आणि डावलण्यासारखेही नाही अशी अभ्यासकाला जाणीव होते. यातच समीक्षक श्रीकेक्षींचे सामर्थ्य सामावलेले आहे.

साहित्याच्या आणि समीक्षेच्या क्षेत्रात एकाच वेळी अनेकजण वावरत असतात. त्यातील काही जण आपल्या मतांबद्दल फार आग्रही असतात. याच वृत्तीमुळे साठ-पासष्ट वर्षांपूर्वी फडक्यांचा कलावाद आणि खांडेकरांचा जीवनवाद सर्वतोमुखी झाला होता. बरीच वादावादी झाल्यानंतर माडखोलकरांनी या वादाचा एकांगीपण दाखवून दिला आणि 'कला-जीवन वाद' असा समन्वय सुचविला. हा उद्योग श्रीकेक्षींना नेहमीच करावा लागला. याचे ठळक उदाहरण म्हणजे त्यांची 'एकच प्याला'ची गाजलेली प्रस्तावना. गडकऱ्यांच्या निधनानंतर त्यांच्या साहित्याबद्दल लिहिण्याबोलण्याची प्रथाच पडली. माटे, फडके, खांडेकर, अत्रे, माडखोलकर अशा त्या काळातल्या आघाडीच्या लेखकांनी गडकऱ्यांबद्दल अनेकदा लिहिले. रा. ग. हर्षे, रा. शं. वाळिंबे यांनी तर गडकऱ्यांबद्दल लिहिण्याचा सपाटाच लावला. 'गडकऱ्यांचे अंतरंग' लिहून डॉ. वाळिंबे यांनी गडकऱ्यांच्या कवितेत दोन दीर्घ अक्षरांची प्रेयसी कोण याबद्दल विविध कल्पना लढवल्या. तर 'सुधाकर की एकच प्याला' या पुस्तकातून त्यांनी दारूचे दुष्परिणाम सांगून समाजाचे उद्‌बोधन करण्यासाठीच गडकऱ्यांनी हे नाटक लिहिले असे वाचकांना आग्रहपूर्वक बजावले. वि. स. खांडेकरांच्या 'गडकरी: व्यक्ती आणि वाङ्मय' या ग्रंथात गडकऱ्यांच्या काव्याबद्दल फारसे काही लिहिलेले आढळत नाही. मात्र त्यांनी त्यांच्या प्रत्येक नाटकाची विस्तृत चर्चा करून 'एकच प्याला'ची रचना कशी विस्कळीत आणि सदोष आहे हेच दाखविण्यावर भर दिला. 'किर्लोस्कर-देवल-गडकरी' या व्याख्यानांतून झालेल्या पुस्तकांतून ना. सी. फडके यांनी भाषेचा फुलोरा आणि अलंकरणाचा झगमगाट यातच गडकऱ्यांचे यश आहे असे आपल्या पद्धतीने वाचकांच्या गळी उतरविले.

गडकऱ्यांच्या साहित्याची ही परवड पाहून श्रीकेक्षी अस्वस्थ झाले आणि त्यातूनच त्यांची 'एकच प्याला'ची प्रस्तावना सिद्ध झाली. 'एकच प्याला' मराठीतील सर्वश्रेष्ठ अशी रोमँटिक शोकांतिका असून तिचे रहस्य समजायला वाचकाचीही मनोवृत्ती रोमँटिकच असली पाहिजे हा त्यांच्या विवेचनाचा रोख आहे. जगाच्या साहित्यविश्वात ट्रॅजिडी हा एक आव्हानात्मक नाट्यप्रकार कसा आहे, ट्रॅजिडीचा नायक वृत्तीने कसा असतो हे सांगताना "उमदा मानव

आणि अंध नियती'' हे सूत्र श्रीकेक्षींनी अशा काही प्रभावी शब्दांत सांगितले आहे की ते जिज्ञासू वाचकांच्या मनाचा कब्जा घेतल्याशिवाय राहत नाही. ट्रॅजिडीच्या आस्वादकाच्या ठिकाणी अपेक्षित असे रोमँटिक मन श्रीकेक्षींचे असल्यामुळे त्यांची ही प्रस्तावना गडकऱ्यांच्या साहित्याला खराखुरा न्याय देणारी झाली आहेच, पण नंतरच्या अभ्यासकांना मार्गदर्शकही ठरली आहे. ''नाटककार गडकरी'' हा नवा ग्रंथ लिहिताना रा. शं. वाळिंबे यांनी आपली पूर्वी मांडलेली भूमिका पूर्णपणे बदलली, यातच श्रीकेक्षींच्या प्रस्तावनेची परिणामकारकता दिसून येते.

चुकीच्या मूल्यमापनामुळे निर्माण झालेले गैरसमजाचे धुके दूर करणे हे काम जसे श्रीकेक्षींना करावे लागले, त्याप्रमाणे अकारण गौरवाचे फुगे फोडण्याचेही काम त्यांनी प्रसंगी केले. खाडिलकरांच्या 'कीचकवध' नाटकावरील लेख हे त्याचे नमुनेदार उदाहरण म्हणता येईल. ना. सी. फडके यांनी 'जगाच्या नाट्यवाङ्मयात मानाचे स्थान मिळवील असे अलौकिक नाटक' अशा शब्दांत या नाटकाची स्तुती केली आहे. महाभारताचा विराट पर्व हा कथाविषय, अचूक अशा राजकीय रूपकाची योजना, प्रारंभापासून रंगत जाणारा प्रयोग, उत्कंठावर्धक मांडणी या कारणांमुळे अनेकांनी या नाटकाची प्रशंसा केली आहे. कर्झनशाहीबद्दल जनतेच्या मनात निर्माण होणारा क्षोभ आणि शेवटी या नाटकावर तत्कालीन सरकारने घातलेली बंदी यामुळेही अनेक अभ्यासक या नाटकाला यशस्वी मानतात.

श्रीकेक्षींनी मात्र नाट्यदृष्ट्या 'कीचकवध' कसे सदोष आहे, द्रौपदीचे व्यक्तिदर्शन कसे परिणामशून्य आहे, प्रभावी संघर्षाचा अभावच या नाटकांत सर्वत्र कस जाणवतो आणि मुख्यत: नाटककाराची भाषा कशी असभ्य आणि अभिरुचीशून्य आहे हे साधार दाखविले आहे. श्रीकेक्षींचे हे विवेचन वाचून या नाटकाचा फेरविचार केला पाहिजे अशी वाचकाची भावना झाल्याशिवाय राहात नाहीं.

साहित्याच्या क्षेत्रात मतमतांतरे असणारच. पण लेखक किंवा साहित्यकृती यांच्याबद्दल अकारण किंवा सकारण चुकीचे ग्रह विविध अभ्यासकांनी निर्माण करीत राहायचे आणि आपण ते दुरुस्त करीत राहायचे या प्रकाराला अंत नाही, असे प्रतिक्रियात्मक लेखन करीत बसण्यापेक्षा साहित्यविषयक सर्व प्रश्नांची साधकबाधक चर्चा करणारा ग्रंथच लिहिला पाहिजे ही जाणीव श्रीकेक्षींना होत राहिली असणार. त्यांना अशा ग्रंथासाठी पुरेसे स्वास्थ्य आणि अनुकूल वातावरण हवे होते. ते त्यांच्या निवृत्तीच्या सुमारास विद्यापीठ अनुदान आयोगाच्या एका योजनेमुळे प्राप्त झाले; आणि त्यातूनच 'टीकाविवेक' ची निर्मिती झाली.

'टीकाविवेक' हा श्रीकेक्षींच्याच नव्हे तर मराठी समीक्षासाहित्यातला एक महत्त्वाचा टप्पा आहे. श्रीकेक्षींनी निवृत्त होताना मराठी साहित्यविश्वाला दिलेली ही अपूर्व भेट असेच म्हटले पाहिजे. त्यांच्या तीन-चार दशकांच्या अभ्यासाचे हे फलित भरभक्कम ग्रंथाच्या रूपात अभ्यासकांपुढे आल्यामुळे त्याचे सर्वच मोठ्या प्रमाणात स्वागत झाले. अत्र्यांच्या 'मराठ्यां'सह अनेक वृत्तपत्रांनी अग्रलेख लिहून या समीक्षाग्रंथाची दखल घेतली, हे दृश्य मराठीत तरी अपवादात्मकच म्हटले पाहिजे.



अनुक्रमणिका

तात्त्विक चर्चेचा पूर्वार्ध आणि उपयोजनाचा उत्तरार्ध असे या ग्रंथाचे दोन भाग आहेत. पूर्वार्धात विषयप्रवेशाला दिलेल्या काही प्रकरणानंतर श्रीकेक्षींनी सौंदर्यवादाचे विश्लेषण आणि विवेचन विविध अंगांनी केले आहे. सौंदर्यवादाचे अभिमानी आणि समर्थक अशी श्रीकेक्षींची आधीपासून प्रतिमा असल्यामुळे हे सगळे अपेक्षितच होते. पण तितक्याच विस्ताराने त्यांनी वास्तववादाचाही परामर्श घेतला आहे हे लक्षणीय आहे. अभिजातवादाची प्रतिक्रिया म्हणून सौंदर्यवाद, सौंदर्यवादाची प्रतिक्रिया म्हणून वास्तववाद या रूढ कल्पना श्रीकेक्षींना अमान्यच आहेत. त्यांच्या मते हे दोन केवळ वाद नव्हेत तर त्या नित्य मानवी प्रवृत्ती आहेत. इतर अनेक वाद लाटेसारखे उत्पन्न होतील आणि विरतील पण सौंदर्यवाद आणि वास्तववाद हे काही असे कधीमधी दिसणारे वाद नव्हेत. मात्र या दोन वादांच्या विश्लेषणावरोबरच श्रीकेक्षी आपले लक्ष वेधतात ते गूढवादाकडे. त्यांच्या मते या दोन्ही वादांची परिणती गूढवादातच होत असते हेच श्रेष्ठ साहित्यकृतींच्या बाबतीत दिसून येते. या प्रकारे गूढवादाला समीक्षा विचारात आजवर श्रीकेक्षींनीच काय ते महत्त्व दिलेले आढळते.

काही अभ्यासकांना असल्या गूढवादाबद्दल खरे-खोटे ठरविण्याचे वस्तुनिष्ठ निकष नाहीत असे वाटते. त्यामुळे ते या बाबतीतले श्रीकेक्षींचे म्हणणे स्वीकारीत नाहीत. हा अपवाद सोडला तर टीकाविवेकचा पूर्वार्ध हा अभ्यासकांना भरीव असे काही देणारा ठरला आहे, यात शंका नाही.

'टीकाविवेक'च्या उत्तरार्धातून श्रीकेक्षींच्या व्यक्तिगत आवडीनिवडी अधिक प्रमाणात प्रकट झाल्या आहेत. प्रामुख्याने आधुनिक मराठी वाङ्मयातील महत्त्वाच्या साहित्यकृती डोळ्यांसमोर ठेवून हे विवेचन त्यांनी केले आहे. केशवसुत, हरिभाऊ, केतकर, वा. म. जोशी, माधवराव पटवर्धन यांच्याबद्दल श्रीकेक्षींनी विस्ताराने लिहिणे अपेक्षितच होते. विशेष म्हणजे वृत्तीने अगदी वेगळे असलेल्या मर्ढेकरांबद्दलही श्रीकेक्षींनी लिहिताना कुठे हात आखडता घेतलेला नाही. अश्रद्धेतून निर्माण झालेल्या मर्ढेकरी काव्याची परिणती कडवटपणात झाली, यात श्रीकेक्षींना आश्चर्य वाटत नाही. गांभीर्य आणि थिल्लरपणा याची चमत्कारिक भेसळ मर्ढेकरांनी केल्याचे ते दाखवतात. पण मर्ढेकर आणि नवसाहित्य यांबद्दल त्यांची मते एकदाच काय ती ठरून गेली होती. त्यामुळे असे होणे क्रमप्राप्त आहे. या उत्तरार्धात श्रीकेक्षींचे रागलोभ कसे तीव्र होते याचे सतत दर्शन घडल्यामुळे त्या कारणासाठीही त्यांचे विवेचन आकर्षक ठरले आहे. आश्चर्य वाटते (आणि खेदही होतो तो) यासाठी की एवढ्या सुदीर्घ ग्रंथात कुसुमाग्रज-बोरकरांसारख्या मराठी कवितेचे सामर्थ्य वाढविणाऱ्या कवींचा कारणापुरता नामोल्लेख व्हावा आणि बहिणाबाई, ग.दि. माडगूळकर, इंदिरा संत यांच्या अस्सल मराठी कवितेची श्रीकेक्षींनी दखलही घेतलेली नसावी! अशी असमाधानाची आणखीही काही स्थळे दाखविता येतील.

हे सर्व असूनही 'टीकाविवेक'चे श्रेष्ठत्व अमान्य करता येणार नाही. प्राचीन साहित्यशास्त्राच्या आधारे लिहिलेल्या ग्रंथांची मराठीत परंपरा आहे. (त्यातला सर्वमान्य ग्रंथ म्हणजे ग. त्र्यं. देशपांडे यांचा 'भारतीय साहित्यशास्त्र') पण ग्रीक साहित्यापासून सर्व पाश्चात्य विचारांचा

मागोवा घेणारा प्रमाणभूत ग्रंथ मराठीत तरी दुर्मिळ आहे. श्रीकेक्षींनी या ग्रंथात प्लेटो आणि शेक्सपीअरप्रमाणे भरतमुनी आणि कालिदास यांच्याकडेही लक्ष पुरविले आहे आणि आवश्यक तेथे ज्ञानेश्वर-तुकाराम आणि वामन पंडित - मोरोपंत यांनाही स्थान दिले आहे! श्रीकेक्षींचा सश्रद्ध आणि नीतिप्रधान दृष्टिकोण केवल-कलावाद्यांना रुचणार नाही; त्यांचा सौंदर्यवादही अनेकांना फार ताणलेला वाटेल; त्यांची 'त्रिनेत्रा'ची आणि गूढवादातील परिणतीची भूमिका अस्थानी वाटेल; नवसाहित्यावद्दलचे त्यांचे विवेचन दुराग्रहीही वाटेल, पण तरीही हा ग्रंथ दशांगुळे उरेल एवढी त्याची गुणवत्ता आहे. गेल्या चाळीस वर्षांतील अभ्यासकांना तर तो समीक्षेचा मानदंडच वाटतो एवढे म्हटले तरी पुरे. मराठीत प्रथमत: ग्रंथरूपाने समीक्षालेखन करून नंतर लेखरूपाकडे वळलेले अनेक समीक्षक आहेत. पण प्रथम लेखरूपाने विशिष्ट प्रतिमा निर्माण करून त्याची परिणती ग्रंथरूपात, अशी उदाहरणे फार थोडी आहेत. अशा ग्रंथात समीक्षकाच्या गुणदोषांचे समग्र दर्शन घडते हा वाचकाला होणारा मुख्य लाभ म्हणता येईल. आयुष्याची सत्तरी ओलांडल्यानंतर श्रीकेक्षींचे 'तसबीर आणि तकदीर' हे आत्मचरित्र वाचकांपुढे आले. श्रीकेक्षींच्या जीवनातील चढउतार, हर्षामर्षाचे प्रसंग, सुखद तशाच करुणगंभीर घटना यामुळे हे आत्मचरित्र आकर्षक वाटतेच; पण आपल्या समीक्षालेखनाबद्दलची बरीच अवांतर माहिती श्रीकेक्षींनी दिली असल्याने त्यांच्या 'टीकाविवेक'सह सर्वच लेखनाच्या निर्मितीची सुस्पष्ट कल्पना वाचकाला येऊ शकते.

१९६० च्या सुमारास मराठीत काही भडक शृंगारिक मासिकांची लाट आली होती. शृंगाराच्या नावाखाली ही मासिके बाजारी वाङ्मयच खपवत होती. काही नामवंत कथालेखक या उद्योगात सामील असल्यामुळे या उत्तान कथांना प्रसिद्धीबरोबर प्रतिष्ठाही मिळत होती. 'कलावंतांचे स्वातंत्र्य' या गोंडस तत्त्वाचा आधारही या सगळ्या प्रकारात घेतला जात होता. ग्वाल्हेर संमेलनाच्या अध्यक्ष कुसुमावती देशपांडे यांनी आपल्या भाषणातून यावर झोड उठविली. नंतरच्या सातारा संमेलनाचे अध्यक्ष न. वि. गाडगीळ यांनी केवळ शाब्दिक दखल घेणे पुरेसे नाही असे वाटून कायदेशीर कृती करायचे ठरविले. अनेक मासिकांचे संपादक आणि त्यातील कथाकार यांच्यावर 'अश्लीलता विरोधी कृती समिती' मार्फत खटले भरण्याचा सपाटा सुरू झाला. या समितीच्या वतीने प्रमुख साक्षीदार म्हणून श्रीकेक्षींनी कोर्टात हजेरी लावली. त्यांच्या साक्षीमधून अनेक प्रश्नांची सविस्तर चर्चा झाली. शृंगार-कामुकता-अश्लीलता-बीभत्सपणा या सर्व संकल्पना आणि त्यांच्या सीमारेषांची चर्चा झाली. श्रीकेक्षींची सडेतोड जबानी आणि त्यांच्या युक्तिवादाचा प्रौढ दर्जा यामुळे प्रकरण अंगाशी येत आहे असे दिसताच अभिव्यक्ती-स्वातंत्र्याचा पुकारा करणारे अनेक लेखक सपशेल माफी मागून मोकळे झाले! काही संपादकांना शिक्षाही झाली. वाङ्मयीन वातावरण विशुद्ध राखले पाहिजे या सामाजिक जाणिवेने श्रीकेक्षींनी एक कर्तव्य म्हणून या प्रकरणाकडे पाहिले. एकीकडे टीकाविवेकचे काम चालू असताना श्रीकेक्षींनी ही आघाडी सांभाळली हे उल्लेखनीय आहे. साहित्यासंबंधीची जबाबदारी लेखकांनी पार पाडली पाहिजे या जाणिवेमुळेच त्यांनी म. सा. पत्रिकेचे संपादकत्व स्वीकारले होते आणि नंतर म. सा. परिषदेच्या कार्याध्यक्षपदाची धुराही त्यांनी वाहिली.

श्रीकेक्षी जर केवळ लेखरूपाने किंवा ग्रंथ निर्माण करून समीक्षा लिहीत राहिले असते तर ते फक्त मर्यादित अभ्यासकांपुरते उरले असते. श्रीकेक्षी सामान्य वाचकांपर्यंतही पोचले ते त्यांनी दीर्घकाळ केलेल्या वृत्तपत्रीय सदर-लेखनामुळे. मराठीत अशा विचारवंत सदरलेखकांची एक लक्षणीय परंपरा आहे. श्री. म. माटे, प्रभाकर पाध्ये, माधव मनोहर अशा अनेकांनी वृत्तपत्रीय सदर-लेखनाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. श्रीकेक्षी त्यांपैकीच एक. 'लोकसत्ता' मधून बरीच वर्षे दर रविवारी त्यांचे 'सुखसंवाद' हे सदर येत असे. मुख्यत: वाङ्मयीन पण आनुषंगिक असे कितीतरी सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक विषय ते हाताळीत असत. श्रीकेक्षींच्या शैलीचे सगळे विशेष या लेखनात असतच पण त्याबरोबर आपण सर्वसामान्यांसाठी लिहीत आहोत ही जाणीवही असे. अमूक विषयासंबंधी श्रीकेक्षींना काय म्हणायचे आहे अशी उत्सुकता या सदरलेखनातून निर्माण होत असे. नंतरच्या काळात ते 'रविवार केसरी' साठी 'सहजसंवाद' हे याच प्रकारचे सदर लिहीत असत. आणि उत्तरकालात काही काळ त्यांनी 'तरूणभारत'च्या रविवार आवृत्तीसाठी 'प्राप्तसंवाद' हे सदर चालविले. त्यांच्या सदरांची शीर्षकेही सहेतुक अशीच आहेत. या वृत्तपत्रांमुळे वाचकांपर्यंत 'श्रीकेक्षी' ही आद्याक्षरेही पोचली आणि त्यांच्या लेखणीची ताकदही.

विद्वत्ता, व्यासंग, जीवनसन्मुख वृत्ती, स्वत:च्या मतांबद्दल ठामपणा, वादविवादाची आवड, वाचकांशी संवाद साधण्याची हातोटी, सकारण अभिनिवेश, प्रसंगी आक्रमकपणा, भावनाशीलता, आत्ममग्नता, सिद्धात प्रस्थापनाची योग्यता हे सगळे जुळून आल्यामुळेच श्रीकेक्षी या नावाचा दबदबा आजही जाणवतो. काळाच्या ओघात श्रीकेक्षींचे चाहते वाढतील किंवा कमी होतील; पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करणे कुणाच्याच हिताचे नाही. ज्यांना साहित्याचे आणि जीवनमूल्यांचे अगत्य आहे यांच्या तर नाहीच नाही.

■

डॉ. गं. ना. जोगळेकर
२२ मनीषा गृह. संस्था, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.

## स्वागत

- **कातरवेळ :** एम्.डी. लहानकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.
- **चांदव :** केशव ना. वसेकर, प्रतिभाभास प्रकाशन, परभणी.
- **साक्षात्कार :** केशव ना. वसेकर, प्रभिभाभास प्रकाशन, परभणी.
- **श्रीमान योगी :** रणजित देसाई, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे.
- **पाझर :** क्रांती रा. अनभुले, डॉ. अनभुले प्रकाशन, अहमदनगर.
- **डाव :** बाळकृष्ण गणेश जोशी (पडेकर) उर्मिला जोशी प्रकाशन, कोल्हापूर.
- **संवादशास्त्र :** सुधाकर पवार, मानसन्मान प्रकाशन, पुणे.
- **कालमीमांसा :** अरुण टिकेकर, श्रीविद्या प्रकाशन, पुणे.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# य. गो. जोशी : एक पुनर्मूल्यांकन

(१७ डिसेंबर १९०१ - ७ नोव्हेंबर १९६३)

❑

प्रा. सुजाता शेणई

❑

य. गो. जोशी हे नाव महाराष्ट्राला लघुकथाकार व पटकथालेखक या नात्याने परिचयाचे आहे. सुपारी, शेवग्याच्या शेंगा, वहिनींच्या बांगड्या ह्या त्यांच्या लघुकथा महाराष्ट्रात एकेकाळी खूपच गाजल्या होत्या. 'यगों'नी लघुकथेत नाव मिळविले. परंतु 'हिरकणी', 'होमकुंड' यांसारख्या दहा कादंबऱ्या, 'भोळाशंकर' हे नाटक, 'बोलका सिनेमा' व 'संगीत श्रीमुखात' ही प्रहसने, 'दुधाची घागर' व 'लक्षात राहिलेली माणसे' ही चरित्रात्मक पुस्तके, 'सुबोध ज्ञानेश्वरी', काही संपादने व संपादकीयेही लिहिली. विपुल आणि विविध लेखन करताना 'यगों'ना आपला ठसा उमटविता आला, तो मात्र लघुकथालेखनात.

१९२९ साली 'यशवंत' मासिकात 'यगों'ची पहिली कथा 'एक रुपया दोन आणे' प्रसिद्ध झाली. त्यानंतर रत्नाकर, चित्रमय जगत्, स्फूर्ति व सूर्यकांत या मासिकांतून त्यांच्या लघुकथा प्रसिद्ध होत गेल्या. १९२६ सालापासून मराठी लघुकथेचे दुसरे आवर्तन सुरू होते. याच साली 'रत्नाकर' मासिक सुरू झाले व त्यातून ना. सी. फडक्यांची कथा प्रसिद्ध होऊ लागली. १९२८ साली 'यशवंत' हे सर्वस्वी लघुकथेला वाहिलेले मासिक निघाले. किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, जोत्स्ना, प्रतिभा, संजीवनी, पारिजात अशी साहित्यिक मासिके एकामागून एक निघाली. या सर्व मासिकांनी लघुकथेला पोषक वातावरण निर्माण केले. या काळात ना. सी. फडके, वि. स. खांडेकर, वि. वि. बोकील, अनंत काणेकर, द. र. कवठेकर, श्री. म. माटे, विभावरी शिरूरकर आणि य. गो. जोशी हे लघुकथालेखक लघुकथेचा कस वाढवत, विस्तारही करत होते. या लेखकांनी आपले अनुभव तंत्रकौशल्य, कलात्मकता, क्रांतिप्रवणता, सौंदर्यसाधना, सामाजिक जाणीव, राजकीय तत्त्वप्रणाली या विविध अंगांनी कथेत आविष्कृत केले. कथा-वाङ्मयाला लोकप्रियता मिळवून दिली.

इ.स. १९२६ नंतरच्या काळात फडके, खांडेकर यांच्या बरोबरीने य. गो. जोशी हे नाव परिचित झाले. यशवंत मासिकाने कथास्पर्धा घेतली, ज्यात 'यगों'च्या 'शेवग्याच्या शेंगा' या कथेला पहिले बक्षीस मिळाले. न. चिं. केळकर यांनी त्यावेळी पुढील उद्‌गार काढले : "या गोष्टीला पहिला नंबर देणाऱ्यांमध्ये मी एक होतो. थोडक्यात भावना उत्कृष्टपणे प्रगट करणारी अशी ती गोष्ट आहे." या यशानंतर 'यगों'चा आत्मविश्वास वाढला आणि त्यानंतर त्यांनी नंतरच्या काळात सातत्याने विपुल लेखन केले. इंग्रजी चौथीपर्यंत 'यगों'चे शालेय शिक्षण झाले होते. कालिदास किंवा शेक्सपीअर त्यांनी कधीही वाचला नव्हता. त्यांनी लिहिलेल्या कथा जवळपास दोनशे आहेत. स्वत:च्या लेखनामागची भूमिका स्पष्ट करताना ते सांगतात की, "मी आतापर्यंत जे जे लिहिले आहे ते ते मी अगर माझ्या स्नेह्यासोबत्यांनी अनुभवलेले

आहे आणि त्यातील निम्म्याइतके माझ्या स्वत:च्याच आयुष्यातील आहे. त्या दृष्टीने... माझे आयुष्य लिहूनच मी लेखक झालो आहे.''

फडके-खांडेकरांच्या काळात 'यगों' लिहायला लागले. फडक्यांची तंत्रकुशल कथा तर खांडेकरांची ध्येयवादी, कृतकवास्तव, आखीव-रेखीव कथा लोकप्रिय होत असताना 'यगों'नी मात्र आपला वेगळेपणाचा ठसा उमटविला. 'यगों'ची कथा साधीसुधी, तंत्रविन्मुख, गोष्टीवेल्हाळ पण वाचकाच्या अंत:करणाला हात घालणारी होती. स्वत:च्या कथेबद्दल ते सांगतात, ''माझ्या लेखनात विशिष्ट ध्येयवाद नाही. त्याप्रमाणे पत्करलेल्या ध्येयवादाची सर्कस नाही. मी फक्त पाहतो आणि त्यात स्वत:चं अंत:करण ओततो.'' 'यगों'च्या कथांचं वैशिष्ट्य म्हणजे भावनाप्रधान कथा लिहिताना व्यवहारातल्या वास्तवाला नाकारायचं नाही. उदा. त्यांची गाजलेली 'शेवग्याच्या शेंगा' ही कथा ज्यात बहीण-भावांचे निर्मळ प्रेम आहे, पण भाऊ विभक्त झाल्यावर तारकेच्या वाट्याला आलेल्या पोरकेपणाचं दु:खही आहे. वाचकांच्या भावना ओळखून त्यांना नेमके आवाहन करण्याचे सामर्थ्य 'यगों'च्या प्रतिभेत होते. सुपारी, कोथिंबिरीच्या वड्या, रडून मिळविलेली बहीण यांसारख्या कथांतून बहीण-भावांचे निर्व्याज प्रेम वाचकांच्या डोळ्यात अश्रू उभे करते. कौटुंबिक नात्यासंबंधीचा जिव्हाळा 'यगों'च्या कथेतून दिसतो. म्हणून 'जिव्हाळ्याच्या पालखीत' बसलेली जोशांची कथा आहे. 'यगों'ची कथा पूर्णत: 'देश्य' (Indigenous) आहे. कारण तिच्यावर पाश्चात्य, विलायती विचारांचे संस्कार नाहीत. त्यांच्या कथेतील विषय व कथानक, विचार व वातावरण, कल्पना व भाषा किंवा संकेत, आदर्श हे पूर्णत: देशी आहेत. जोशांच्या कथेत केंद्रस्थानी असते ती कुटुंबसंस्था. तिच्या अनुषंगाने येणारी नाती, प्रेम, त्याग, माणुसकी, ताणतणाव, संघर्ष व या सर्वांना जोपासणारी संस्कृती तिच्यामधे येते. दीर-भावजयीमधील उदात्त प्रेमसंबंध 'वहिनीच्या बांगड्या' या कथेत, आई-मुलातील भावबंध 'अन्न आणि अन्न', 'निकामी घोड्याचे काय करतात?' या कथांत पती-पत्नी मधील प्रेमसंबंध 'नवरा-बायकोनी सांगितलेली गोष्ट', 'कर्ज फिटले पण सावकार गमावला' या कथांतून दिसतात. 'यगों'च्या कथांतून भर दिसतो तो भावसंबंधावर, व्यक्तिरेखांवर नाही. माणूस हा कुटुंबात राहणारा, समाजात वावरणारा समूहप्रिय प्राणी आहे. कुटुंबसंस्था जिच्यात कालाप्रमाणे बदल होतील पण तरीही कालातीत आहे. तशी 'यगों'ची कुटुंबवत्सल, जिव्हाळ्याची कथाही कालातीत आहे. प्रेम, त्याग, उदात्तता ही शाश्वत मूल्ये या कथेत आहेत. त्यामुळे एकविसाव्या शतकातही ती माननीय ठरते.

भावनेचे सामर्थ्य विचारांपेक्षा जास्त आहे, असे जोशी मानतात. उत्कट भावनेच्या बळावर ते मानवी जीवनाचे गूढ उकलू पाहतात. 'नॉन', 'कर्ज फिटले पण सावकार गमावला', 'दिवाळीची देणगी', 'वहिनीच्या बांगड्या' या कथांतून त्याचा प्रत्यय येतो. त्यांच्या कथांत चमत्कार व योगायोगही सहज येतात. भावनाबळामुळे ते कथेत विसंगत वाटत नाहीत व वाचकाला खटकतही नाहीत. वहिनीच्या पार्थिव देहाचे दहन झाल्यावरही तिच्या हातातील बांगड्या जशाच्या तशा राहतात, यावर लेखकाचे भाष्य आहे की, ''यात कुणाला अतिशयोक्ती किंवा बुद्धीचा भ्रामकपणा वाटेल पण अशांना मी छातीठोकपणे सांगतो की, माझ्याइतके

निर्व्याज प्रेम तुम्ही कुणावरही करा - आणि मग असे दैवी आभास मनाला होतात की नाही ते पहा.''

'यगों'च्या सामाजिक कथांतून वास्तववाद हा विशेष दिसून येतो. 'गजरा मोतियाचा' 'सोन्याचा ताईत', 'चांदण्यातील सहल', 'अजि म्यां ब्रह्म पाहिले!' 'नरमांसभक्षक' इ. कथांतून पावलोपावली तडजोड करून जगणारी माणसं आहेत. माणूसच माणसाच्या अधोगतीला व दु:खाला कारणीभूत होतो, आपल्या मूल्यांना तिलांजली देऊन त्यांना जगावे लागणारे लाचारीचे जीवन इत्यादीचे विचारप्रवर्तक वर्णन यगो करतात. आजची परिस्थिती याच्यापेक्षा फार निराळी आहे, असे प्रत्ययाला येत नाही म्हणून 'यगों'ची कथा आजही वाचनीय आहे.

'यगों'नी विपुल कथालेखन केलं. त्यांच्या व्यक्तिचित्रणात्मक कथांतून सुष्ट-दुष्ट, लबाड, लुबाडणारी, भोळी, श्रद्धेवर जगणारी अशी सर्व वृत्तींची माणसं येतात. या व्यक्ती समाजात त्यांना जशा दिसल्या तशा मांडल्या. आपल्या कल्पना ते त्यांच्यावर लादत नाहीत व त्यांचा जिवंतपणाही कमी होऊ देत नाहीत. 'धर्म ही अफू आहे!', 'वाटेतले दगड', 'आरसा', 'राहिलेले शब्द', 'सखाराम' या कथांतून अशा वृत्तीची माणसे भेटतात. 'यगों'नी जी विविध पात्रे रंगवली, त्यातून त्यांच्या साहित्यातील जीवनविषयक जाणिवा रुंदावतात. वाचकाचा जीवनविषयक अनुभव समृद्ध व विविधांगी होतो.

सुधारणा, सुधारक, सुशिक्षित तरुण-तरुणी, त्यांचा कल्पनारम्य प्रणय, पुढे विवाहोत्तर होणारे त्यांचे संसार, शिक्षण क्षेत्रातले नवे प्रयोग, चित्रपटसृष्टीतल्या विविध हालचाली इत्यादींवर त्यांनी आपल्या कथांतून नेहमी उपहासाचे हत्यार चालवले. 'फोलपटांचा चिवडा', 'मेव्हणा आणि लिमिटेड कंपनी', 'पैज', 'लेकरांची जिज्ञासा', ठोकळ्याचे चित्र', 'आरोग्याचा शत्रू', 'आटोपशीर संसार' या त्यांच्या कथा उपहासप्रधान होत. 'ग्यानबा तुकाराम आणि टेक्निक' ह्या प्रसिद्ध कथेत त्यांनी लेखनतंत्राचा उपहास केला आहे.

'यगों' ज्या काळात कथा लिहीत होते त्या काळात तंत्रवादाचे बरेच प्राबल्य मराठी कथेवर होते. जोशांना तंत्राबद्दल तिटकारा होता. डॉ. स. गं. मालशे यांच्या मताप्रमाणे, ''जे ठरीव चौकटीचे तंत्र नाही, तेच जोशांचे तंत्र!'' तंत्रवादाबद्दल जोशी म्हणतात, ''तंत्राचे स्तोम माजवू नका! चांगल्या लेखनात तंत्र आपोआप निर्माण होते''. म्हणजेच अमुक अशा तंत्राने लिहावयाचे असे ठरवून य. गो. जोशी यांनी लेखन केलेले नाही, हेच खरे. तंत्र हे कथेच्या गळ्यात अडकलेले लोढणे आहे, अशी ठाम समजूत असल्यामुळे त्यांच्या कथेला कोणताच यांत्रिकी बंदिस्तपणा नाही. जोशांच्या कथेत प्रत्यक्ष अनुभव असलेली घटना वाचकांशी गप्पा मारत सांगितली जाते, त्यामुळे कथेची निवेदनशैली वेगवेगळी होते. कथा म्हणजे कधी मनमोकळ्या गप्पा, कधी कवितांचे पाठ, कधी उतारे, कधी ललित निबंध तर कधी पेपर्स अश्या होतात. तिच्यात आखीव बंदिस्त कथानक नाही. 'यगों'ची लेखनपद्धती स्वयंभू, स्वतंत्र आहे. ती अनुवादात्मकही नाही आणि अनुकरणात्मकही नाही.

'यगों'च्या जन्मशताब्दी वर्षात त्यांच्या कथांचे पुन्हा अवलोकन केले, तर त्यातील जिवंतपणा आजही कमी झाल्यासारखा वाटत नाही. कथेतील घटना, व्यक्ती, त्यांच्यातील

संघर्ष याचे स्वरूप बदलले तरी मूळ बैठक बदललेली नाही म्हणून कौटुंबिक, सामाजिक किंवा कोणतीही कथा असली तरी ती कालवाह्य ठरत नाही. विपुल कथालेखन 'यगों'नी केल्याने जीवनाच्या अनेक अंगांना ती स्पर्श करते. मानवी जीवन हे गूढ संचित आहे. कलावंत आपल्या परीने ते उलगडण्याचा प्रयत्न करीत असतो. 'यगों'नी ते आपल्या कुवतीप्रमाणे ते उलगडले आणि मराठी कथेला संवर्धित करण्याचा प्रयत्न केला.

■

सुजाता शेणई
सर्व्हे नं. १८/३/१०, विठ्ठलनगर, बी-२, शांती-दीप, पुणे ५१. फोन नं. ४३५४४६६

---

## स्वागत

- **माती उन्हाचे चंद्र :** संतोष विठ्ठल घीसिंग, नीहारा प्रकाशन, पुणे.
- **यमुनाजळ :** हरी प्रभुमिराशी, माधवी प्रकाशन, पुणे.
- **शब्दांचं गाव :** प्रा. अजित पाटील, ग्रंथविशेष प्रतिष्ठान, सातारा.
- **अनुभवामृत बोधेश्वरी प्रीयुचि प्राणेश्वरी :** महायोगी स्वामी उमानंद सरस्वती, ॐ प्रकाशन, पुणे.
- **प्लॅटफॉर्म :** लक्ष्मण सूर्यमान, निशीराज पब्लिकेशन्स, पुणे.
- **कोरा शंकरन** (मराठी), जयश्री शंकरन्, जयश्री प्रकाशन, पुणे.
- **सी. आर. शंकरन :** (इंग्रजी) जयश्री शंकरन्, जयश्री प्रकाशन, पुणे.
- **प्रकाश यात्री :** आनंद सराफ, न्यूजमन मिडीया सर्व्हिसेस, पुणे.
- **धुळपेरणी :** शेषराव मोहिते, देशमुख आणि कंपनी प्रा. लि., पुणे.
- **एक होतं जगणं :** मंगेश उदगीरकर, देशमुख आणि कंपनी प्रा. लि., पुणे.
- **सन्नती क्षेत्र महात्म्य :** डॉ. भिमाशंकर देशपांडे, प्रकाशक - डॉ. भिमाशंकर देशपांडे.
- **कर्नाटकातील ज्ञानेश्वर :** डॉ. भिमाशंकर देशपांडे, प्रकाशक - डॉ. भिमाशंकर देशपांडे.
- **मृत्यूंजय :** अनु. श्रीनिवास पटवर्धन, युनिटी प्रकाशन, पुणे.
- **अंधारयात्री :** डॉ. अमिताभ, साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
- **प्राण्यांची शाळा :** शं. ल. नाईक, साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
- **व्यसनमुक्ती :** आचार्य देवेंद्र मुनी, साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
- **नव्या घरी :** अनु. माणिक फाटक, साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
- **पूज्य :** नीता चंद्रकांत कुलकर्णी, नवभारत प्रकाशन, मुंबई.
- **काळोखाचे काठ :** रेखा भांडारे, गमभन प्रकाशन, पुणे.
- **भाकरीचा शोध :** प्रा. साईनाथ पाचरणे, श्रुती प्रकाशन, नागपूर.
- **चांदगावातील हसणावळ :** प्रा. साईनाथ पाचरणे, प्रेरणा प्रकाशन, पुणे.
- **बोल बोलवा :** दीपाली कात्रे, धनदीप नर्सरी प्रकाशन, अंबरनाथ.
- **भक्तामरस्तोत्र :** कांतीलाल चुतर, संदुर सन्मती साहित्य प्रकाशन.

# एका समीक्षकाची जडणघडण

❑

जयंत वष्ट

❑

**प्रा.** व. दि. कुलकर्णी १९४० मध्ये मॅट्रिक झाल्यानंतर प्रथम पुण्यात आले. आपल्या आवडत्या आदर्श फर्ग्युसन महाविद्यालयात शिक्षण घेऊन पदार्थविज्ञान व गणित या विषयांचा अभ्यास करून संशोधक, शास्त्रज्ञ होण्याचे स्वप्न या काळात 'वदिं'नी मनात बाळगले होते. पुढे काळ बदलला, परिस्थितीही बदलली. 'वदिं'ना आर्थिक, कौटुंबिक व दृष्टीदोषाच्या कारणाने शास्त्र शाखा सोडून 'मराठी'कडे यावे लागले. शास्त्राच्या अभ्यासाच्या वा वाङ्मयाच्या अभ्यासाच्या दृष्टीने आयुष्यातली बरीच वर्षे वैराण गेली. पण यातून सावरत 'वदि' फर्ग्युसनमधून बी.ए. झाले. विद्यापीठात पहिले आले. प्राज्ञ, विशारद झाले. एम.ए.ही झाले. परिस्थितीनुसार विविध खाजगी शाळांत शास्त्र, गणितापासून ते मराठी संस्कृत शिकवीत शिकवीत शेवटी पुण्याच्या स. प. महाविद्यालयात १९५६ मध्ये मराठीचे व्याख्याते झाले.

या साऱ्या काळात ते बहुतांश काळ पुण्यात होते. प्रारंभी शास्त्राचा व नंतर सातत्याने वाङ्मयाचा अभ्यास करीत होते. त्यांच्यावर या जडणघडणीच्या काळात जे संस्कार झाले त्यात महाराष्ट्र साहित्य परिषदेचा फार मोठा वाटा आहे. 'वदि' नेहमीच हे ऋण मान्य करीत आले आहेत. याच मसापच्या 'पटवर्धन' सभागृहात त्यांनी प्राज्ञ, विशारद व आचार्यचा अभ्यास केला. येथे वा. दा. गोखले यांच्यासारख्या 'सोन्याचे पिंपळपान' देणाऱ्या आचार्यांकडून 'वदिं'च्या मनात असणाऱ्या 'ज्ञानेश्वरी'च्या अभ्यासास प्रारंभ झाला. संत साहित्याची जाण आली. अभ्यासाची वीजे रुजली. मसापने त्यांना केवळ साहित्याची दृष्टी दिली असे नाही तर साहित्याच्या अध्यापनाच्या दृष्टीचा लाभही त्यांना येथेच झाला. कलाकृतीच्या अंतरंगात, खोलवर बुडी मारून कसे उतरावे, तळ कसा गाठावा आणि एकजिनसीपणाने तिचे सौंदर्यरूप कसे अनुभवावे हे श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यापनातून 'वदिं'ना कळले. तर समग्र काव्यशास्त्र एकजिनसीपणाने, सर्वार्थाने एकाच व्याख्यानात स्पष्ट करणाऱ्या, मराठीच्या 'क्षेमेंद्रा'स 'चांद्रमसी' प्रकृतीच्या, संयमी प्रा. रा. श्री. जोगांसारखे प्राध्यापक ही 'वदिं'ना प्रथम 'मसाप'तच भेटले.

जोग-क्षीरसागर यांच्याप्रमाणेच 'प्रवृत्तिधर्माचे प्रवक्ते' आणि 'ऐश्वर्याच्या राजविद्येचे पुरस्कर्ते' डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांच्या अध्यापनाचा परिचय 'वदिं'ना पुण्यातच झाला. डॉ. सहस्रबुद्धे ज्या मानवी समाजाच्या अत्यंत परिणत अवस्थेला — 'लोकसत्ते'ला प्राणतत्त्व मानीत, ते समजून घेत 'वदिं'नी डॉक्टरांचे 'ग्रंथसत्ता ही सर्वंकष सत्ता आहे' हे जाणून घेतले. स्वतःचा संस्कृतचा अभ्यास नानासाहेब (प्रा. के. ना.) वाटवे यांच्यासारख्या 'रसविमर्श'कारांकडून अधिक पक्का करून घेतला.

स. प. महाविद्यालयातील तीन वर्षांच्या अध्यापनात 'वदिं'नी कथा-कादंबरी-नाटक-अगदी 'भाऊसाहेबांची बखर' ही मनापासून, रंगून शिकवली. त्यांनी विद्यार्थ्यांना कलाकृतीच्या अंतरंगात कसे उतरायचे, तिच्याशी तारतम्य पावायचे म्हणजे काय, तिचे सौंदर्य कसे अनुभवायचे याची कल्पना दिली. जोग-क्षीरसागरांच्या अध्यापनातून स्वत:ची अध्यापनपद्धती स्थिर करीत विद्यार्थ्यांना शिकविले. अव्वल इंग्रजी वाङ्मयाचा शिकविण्याच्या निमित्ताने स्वत:ही अधिक अभ्यास केला. 'रत्नावली', 'स्वप्नवासवदत्तम्'सारखी संस्कृत नाटके शिकविता शिकविता जुन्या-नव्या साहित्य शास्त्रांच्या अभ्यासातून स्वत:ची साहित्यशास्त्रविषयक जाणीव सुस्थिर केली.

'वदिं'ची वाङ्मयेतिहासाची संकल्पना-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती यांविषयीची संकल्पना प्रा. गं. बा. सरदार यांच्या व्याख्यानांमुळे स्पष्ट झाली व त्यांच्या अनाग्रही वृत्ती व सर्वस्पर्शी 'दृष्टी'चाही परिचय झाला. स्वत:चा वाङ्मयेतिहासविषयक अभ्यास सादर करताना ह्याचा त्यांना उपयोग झाला. अभ्यासात कोणतीही शंका आली तर प्रा. जोग-क्षीरसागर यांच्यापासून ते प्रा. सरदार-दि. के. बेडेकरांपर्यंत सर्वांशी चर्चा करून निरसन करून घेण्याची संधी त्यांना पुण्याच्या वास्तव्यात मिळाली.

'म.सा.प.'मध्ये 'वदिं'नी प्राज्ञ-विशारद-आचार्य या वर्गांना शिकविले आणि येथेच आपल्या बहिणीबरोबर येणाऱ्या तिच्या मैत्रिणीशी — आपल्या विद्यार्थिनीशी — १९५५ मध्ये विवाह केला. सौ. सुमित्रावहिनींनीही 'वदिं'चे वैवाहिक जीवन फुलवले. त्यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाच्या विकासासही त्या साह्यभूत ठरल्या. पुण्याने 'वदिं'ना सर्वार्थाने स्थिर केले. हे सारे संचित घेऊन आपली वाङ्मयीन क्षितिजे विस्तारण्यासाठी १९५९ मध्ये 'वदि' मुंबईस गेले; तेव्हा त्यांच्या गाठीशी स. प. महाविद्यालयातील अध्यापनाचा अनुभव होता, समीक्षालेखनाची जाण होती आणि जिज्ञासू, जागृत ज्ञानदृष्टी.

कराचीत ज्यांच्या मार्गदर्शनाखाली 'वदिं'नी अध्यापनसूत्रे समजून घेतली, त्या प्राचार्य मा. सी. पेंढारकरांनी 'वदिं'ना मुंबईत पार्ले महाविद्यालयात बोलावून घेतले. 'वदिं'नाही मुंबई आणि मुंबईतले मर्ढेकर-पु. शि. रेगे यांच्या भोवतालचे वाङ्मयीन वातावरण समजून घ्यावेसे वाटत होते. बोरकरांचा पाठिंबा होता आणि वा. रा. तथा भाऊसाहेब ढवळ्यांना ते 'साहित्य संघा'त हवे होते. प्रारंभी डॉ. सहस्रबुद्धे यांनी नाराजी दर्शविली पण नंतर त्यांनी आशीर्वादही दिला. प्रा. वा. दा. गोखले, के. नारायण काळे आणि दि. के. बेडेकर यांनाही 'वदिं'चे मुंबईस जाणे योग्य वाटले आणि त्यांच्याच प्रोत्साहनाने 'वदि' मुंबईच्या आधुनिक वाङ्मयीन वातावरणात दाखल झाले.

पार्ले महाविद्यालय आणि मुंबई विद्यापीठात मिळून 'वदि' एकूण चोवीस वर्षे पार्ल्यात राहिले. मुंबईने त्यांना नवी दृष्टी दिली, त्यांची वाङ्मयीन जाणीव सर्वार्थाने प्रगल्भ केली. पार्ले महाविद्यालयात गुजरातीचे डॉ. रमेश जानी, कानडीचे डॉ. ब्यारताळ यांच्या भाषांच्या सखोल अभ्यासाद्वारे चर्चा करताना मराठी साहित्यातील प्रवाहांचा तुलनात्मक विचार 'वदिं'ना अधिक चांगल्या पद्धतीने करता आला. याच काळात 'वदिं'नी महानुभाव वाङ्मयाचा अभ्यास केला.

वऱ्हाडात मठा-मठांतून जुन्या पोथ्या धुंडाळत, हिंडत 'वदिं'नी या सहसा हस्तगत न होणाऱ्या वाङ्मयातून महानुभावांच्या मनात प्रवेश केला. त्या अभ्यासकांचा विश्वास संपादन करून 'लीळा चरित्रा'चा आपला अभ्यास मांडला. हे 'वदिं'चे पहिले समीक्षात्मक पुस्तक. हा अभ्यास केवळ मराठीच्या अभ्यासकांच्या, संशोधकांच्या पसंतीस उतरला एवढेच नव्हे तर महानुभाव परंपरेतही त्या अभ्यासाचा गौरव झाला. मान्यता मिळाली. 'श्री चक्रधर स्वामींचे मोकळे दृष्टांत (संहिती व समीक्षा)', 'मोकळे दृष्टांत' 'अज्ञात लीळा' या महानुभाव वाङ्मयावर अभ्यास करता करता 'वदिं'नी 'गोविंदप्रभू'चरित्राचेही दीर्घ प्रस्तावना लिहून संपादन केले.

याच काळात एकोणिसाव्या शतकाचा अभ्यास करता करता 'वदिं'नी 'सत्यकथे'तून मराठीतील समीक्षकांवर लेख लिहिले. अर्वाचीन कवी-कादंबरीकारांविषयी लिहिले. 'वसंत' मासिकातून समीक्षालेखन केले. या समीक्षेबरोबरच काव्यशास्त्रीय तात्त्विक लेखनही केले. स्वत:च्या-मुंबईच्या वाङ्मयविश्वाशी समरस होऊन स्वत:च्या समीक्षालेखनाची बैठक 'वदिं'नी पार्ले महाविद्यालयात पक्की केली. यानंतर 'मुंबई विद्यापीठात' 'वदि' रीडर म्हणून गेले. प्रारंभापासूनच त्यांना प्रभारी प्रमुख म्हणून काम करावे लागले. तरीही विद्यापीठीय राजकारणाचा त्यांना त्रास झाला. पण 'वदिं'ना या साऱ्यांस सौजन्याने सांभाळून घ्यावे लागले. आपल्या विद्यापीठीय संकटांविषयी, मानभावी वर्तनांविषयी 'वदि' सर्वत्र मूक राहिले. पण वाङ्मयीन दृष्ट्या मात्र विद्यापीठीय स्तरावर त्यांना नव्यानव्या योजना राबविता आल्या.

विद्यापीठात असताना केवळ आवश्यकता म्हणून 'वदिं'नी पीएच.डी. पदवी मिळवली. अभ्यास, संशोधन हे अभ्यासासाठी स्वत:चे व विद्यार्थ्यांचे ज्ञानक्षितिज विस्तारण्यासाठी असते या भूमिकेतून अध्यापन करत असतानाच १९७४ मध्ये 'वदिं'नी 'संगीतसौभद्र' हा आपला प्रिय अभ्यास विषय ग्रंथरूपात विद्यापीठास सादर केला. येथे 'संगीतसौभद्र'चा वेगळा नाट्यविचार जसा होता तसे गेल्या शतकातील या नाटकावरच्या समीक्षेची समीक्षाही होती.

'वदिं'चे पहिले पुस्तक 'गॅलिलिओ'चे चरित्र. तेव्हा ते विज्ञानाचे अभ्यासक होते आणि 'लीळाचरित्र' हे पहिले समीक्षात्मक पुस्तक. 'संगीत सौभद्र' हा संशोधनपर ग्रंथ. १९७१ नंतर 'वदि' हळूहळू ग्रंथरूपाने, व्याख्यानरूपाने आपला अभ्यास अभ्यासकांसमोर ठेवू लागले होते. 'केशवसुतांचे अंतरंग', 'अर्वाचीन मराठी सारस्वतकार' 'साहित्य : रूप आणि गंध' या ग्रंथांतून 'वदिं'चे वाङ्मयीन चिंतन प्रकट होत होते; त्याचवेळी 'ज्ञानेश्वरी'चे पूर्वी रुजलेले बीज आता आकार घेत होते. आर्वीकर महाराजांच्या 'दिव्यामृतधारे'च्या वाचनाच्या व प्रकाशनाच्या निमित्ताने दाटून आलेली ज्ञानदेवांविषयीची जाणीव प्रत्यक्ष व्यक्त झाली ती 'पु. मं. लाड' व्याख्यान मालिकेतून आणि मग आर्वीकरांच्या विचारांच्या साहाय्याने सुरू झालेले हे ज्ञानदेव वाङ्मयाचे चिंतन-मनन जीवनाचे आविभाज्य अंग बनले. 'ज्ञानेश्वर : काव्य आणि काव्यविचार', 'संत साहित्याची संकल्पना' या ग्रंथांतून व विविध व्याख्यानांतून ते अभ्यासकांना उपलब्ध होऊ लागले.

प्रारंभी काव्याचा व नंतर समीक्षेचा अभ्यास करीत करीत संस्कृतमधल्या विश्वनाथ, जगन्नाथ अभिनवगुप्ताच्या विशुद्ध कलावादी साहित्यशास्त्राबरोबरच हडसन, स्कॉट जेम्स, ॲबरक्रोंबी,

हर्बर रीड यांची इंग्रजी समीक्षा व ॲरिस्टॉटल, आय. ए. रिचर्डस्, ओसबोर्न, कॉलिंग वुड यांचाही अभ्यास 'वदिं'नी केला होता. इंग्रजी हाही एकेकाळी त्यांचा बी.ए.चा स्पेशल विषय होता. एकीकडे 'रोमॅंटिसिझम', 'मिस्टिसिझम' शोधता शोधता दुसरीकडे मर्ढेकर व अस्तित्ववाद अतिवास्तववाद समजून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या मराठीच्या अभ्यासकांचा तो काळ होता. जोग-क्षीरसागरांच्या प्रभावातून साहित्यविषयक चिंतन व समीक्षा जाणून घेत. 'वदि' क्रिएटिव्ह क्रिटिसिझमकडेही वळले होते. डॉ. ग. त्र्यं. देशपांडे यांच्या 'भारतीय साहित्यशास्त्रा' बरोबरच दि. के. बेडेकरांच्या संगतीने पौर्वात्याप्रमाणे पाश्चिमात्य काव्यविचारही 'वदिं'चा अभ्यासविषय झाला होता. पु. शि. रेगे यांच्यासारखे मर्मज्ञ त्याला खतपाणी घालत होते. सारी नवीनता पचवून, मुरवून स्वतःचे विश्व निर्माण करण्याची क्षमता रेगे यांच्यात होती. मूलभूत सत्य-सौंदर्याची जोपासना त्यांच्या कलादृष्टीत 'वदिं'ना जाणवत होती. तर स्वतःच्या काळाच्या कलाविषयक ज्ञानाच्या पलीकडचे सूचित करत, कोणतीही बांधिलकी न स्वीकारता सदैव नव्या वाटा शोधणारे दि. के. बेडेकर आणि त्यांची मनाची क्षितिजे विस्तारणारी टेलिस्कोपिक, मायक्रोस्कोपिक व पॅनोरोमिक (दूरस्थाकडे नेणारी, दूरस्थाला जवळ आणणारी व जवळच्याची सूक्ष्मता) व्यापक दृष्टी 'वदिं'ना सखोल अभ्यासास प्रवृत्त करीत होती. साहित्याचे आस्थेने, आंतरिक रसिकतेने, डोळस वृत्तीने, आकलन-आस्वाद-मूल्यमापन करताना 'वदिं'मधला समीक्षक हा विकास पावत होता. स्वतःचे विचार 'भाष्यकारांते वाट पुसत', तपासून पाहत, प्रसंगी सत्यनिष्ठेपोटी विचारांना नवी दिशा देत 'वदि' घडत होते. बेडेकरांप्रमाणेच प्रा. गंगाधर पाटील यांच्याशी केलेल्या चर्चा, झालेल्या भेटी, 'वदिं'चा परिचय इंग्रजी व अमेरिकन टीकेबरोबरच रशियन, फ्रेंच, जर्मन भाषांतील साहित्यविषयाशी जवळीक साधणाऱ्या ठरल्या. साहित्यकृतीच्या अंतिम मूल्यदर्शनात सर्व समीक्षारीतींचा एकजिनसीपणे अवलंब करून आकलन-आस्वादापर्यंत जायचे कसे ते समजून घेताना 'वदिं'ना ही नवी समीक्षा उपयुक्त वाटली. मराठी टीकाविचार पुढे नेण्यात या विचारांचा वाटा मोठा असल्याचे 'वदिं'ना जाणवले.

मर्ढेकरांच्या काळातले व नंतरचे बदलते साहित्यशास्त्रीय प्रश्न, त्यांची सूक्ष्मता लक्षात घेत 'वदि' आपली समीक्षादृष्टी संपन्न करीत होते. मर्ढेकरांच्या काव्यसूत्रांचे चिंतनातून पुन्हा एकदा संस्कृत काव्यशास्त्राकडे 'वदिं'ना जावेसे वाटले. 'केवलाल्हाद' चा विचार, तांबे यांचा कलाविचार, टागोरांचे साहित्यचिंतन हेही त्यांना मोलाचे वाटत होते. या साऱ्या वाङ्मयीन-साहित्य-शास्त्राबरोबरच 'दिव्यामृतधारा'ची संगत लाभली व तीच प्रभावी होत होत 'वदिं'ना संतसाहित्याकडे आकर्षित करणारी ठरली.

निवृत्तीनंतर, १९८३ नंतर, 'वदि' पुण्यात स्थिरावले. पण या काळात अभ्यासाबरोबर, घरगुती चिंता-विशेषतः पत्नीची सतत बिघडणारी प्रकृती त्यांचा काळजीचा विषय ठरली होती. सौ. सुमित्रावहिनी त्यांच्या लेखनाचा 'पहिला श्रोता' असत. १९८९ मध्ये त्यांचे निधन झाले. 'वदि' या आघातामुळे कोसळले नाहीत, पण खचले, डळमळले, अंतर्यामी अस्वस्थ झाले. परिणामतः एकांतवासी झाले. जीवनात अनेक मृत्यू धैर्याने सहन करता करता ते आता आंतरिक शक्तीचेच 'पसायदान' मागत असावेत, असे वाटत होते. ''पत्नी ही किती मोठी

शक्ती असते?'' हे बोरकरांचे उद्गार 'वदिं'ना जाणवत होते. पण यातून बाहेर पडून, पत्नी आपल्याबरोबर सातत्याने वावरते आहे या मनोभूमिकेतून 'वदिं'नी तिला व इतरांना दिलेली लेखनविषयक आश्वासने प्रत्यक्षात आणायला आरंभ केला.

'सुमित्रा-संवाद' या पत्नीशी केलेल्या स्वगत-संवादातून त्यांनी स्वत:च्या वैवाहिक-वाङ्मयीन जीवनाचा आढावा घेत पत्नीचे स्मरण केले. हे जसे त्यांना लौकिकात स्थिर होण्यासाठी उपयुक्त ठरले तसे अहमदनगरच्या रामकृष्ण महाराज क्षीरसगार यांचा झालेला 'धर्मसंवाद'ही त्यांना आधारभूत झाला.

त्यांच्या 'पसायदान'च्या व्याख्यानांचे पुस्तक मी 'सोऽहम् प्रकाशना'तर्फे प्रकाशित केले. पत्नीबरोबरच्या आत्मसंवादाबरोबरच आत्मचरित्रही 'वदिं'नी लिहावे अशी अपेक्षा सरांच्या आम्ही अनेक विद्यार्थ्यांनी व्यक्त केली होती. 'माझे विद्याजीवन' स्वरूपात 'वदिं'नी 'धुळाक्षरातूनं मूळाक्षराकडे' हे वाङ्मयीन आत्मचरित्र सिद्ध केले. त्यांच्या एकाहत्तराव्या वाढदिवसाला त्यांच्या प्रेमाच्या पाल्र्यातील 'लोकमान्य सेवा संघा'त ते मी प्रसारित केले. गुरूवर्य आबासाहेब कुलकर्णी यांना कबूल केलेली 'आज्ञार्थी गीता ' 'वदिं'नी पूर्ण केली आणि ते संतसाहित्याकडे यापुढच्या आयुष्यात अभ्यास म्हणून वळले.

'संतसाहित्याची संकल्पना' नांदापूरकर व्याख्यानमालेतून 'वदिं'नी मांडली. त्याचा ग्रंथ हैदराबादच्या 'मराठी साहित्य परिषदे'ने प्रसिद्ध केला. पुण्यात दोन टप्प्यांत १९८८ व १९९२मध्ये दिलेल्या व्याख्यानांतून त्यांचे 'ज्ञानेश्वरांचे काव्यशास्त्र' सादर केले गेले आणि 'श्री ज्ञानेश्वरांचा तत्वज्ञ, संत आणि कवी' स्वरूपातील अभ्यासही साधकांसमोर आला. संतसारस्वताचे 'वदिं'चे प्रगल्भ आकलन आणि त्याचा आस्वाद घेण्याची 'वदिं'ची पद्धतीही येथे जाणवली. 'वदि' आता संतसाहित्य-सागरातून शोध घेत ज्ञानसाधना करू लागले.

संतसाहित्याच्या अभ्यासाच्या निमित्ताने ज्ञानेश्वरांच्या समग्र साहित्याच्या अंतरंगात 'वदिं'ना जे नवे धर्मदर्शन घडू लागले, त्यात त्यांनी रामकृष्ण महाराज क्षीरसागरांचे मार्गदर्शन लाभताच — ह्या मोक्षगुरूच्या आशीर्वादाने — ते खरोखरच सर्वार्थाने स्वस्थानी स्थिर झाले. 'या-पार'चे राहून 'त्या-पार'चे अवगाहन सुरू झाले. वडिलीकडच्या परंपरेने विठ्ठलाचे उपासक असणाऱ्या 'वदिं'ना दत्तोपासक क्षीरसागरांच्या रूपात 'मोक्षगुरू' लाभला. यानंतर लेखनासाठी बैठक जमेना. शारीरिक व्याधी हळूहळू त्रासदायक होत गेल्या. साहजिकच लेखनाचे प्रमाण अपेक्षेपेक्षा कमी झाले. पण 'ज्ञानेश्वरी' वरची दीर्घ व्याख्यानमाला, 'योगेश्वर कृष्ण आणि धनुर्धर पार्थ', 'ज्ञानेश्वरांचा परमभक्तीयोग' बरोबरच तुकाराम महाराजांच्या निवडक अभंगांचा 'तुका झालासे विठ्ठल' या व्याख्यानांच्या संहिता तयार झाल्या. 'हरिपाठा'बरोबरच अनुभवामृत, चांगदेव पासष्टीतील 'क्वांटमथिअरी' इ. विचार व्याख्यानरूपांतून त्यांनी श्रोत्यांसमोर मांडले. क्षीरसागर महाराजांनी 'वदिं'ना कसल्याच संप्रदाय, पंथात वा उपासनामार्गात गोवले नाही. त्यांना मोकळे ठेवून त्यांचा मार्ग व दिशा न सुटेल हे पाहून धर्मसाधनेचा मार्ग प्रशस्त केला. त्यांचे 'गुरूसेवा' त्रैमासिकाचे संपादनही या काळात 'वदि' करत होते. महाराजांचे 'धर्मदर्शन' 'वदिं'नी संपादित केले व त्यांच्या साधकांना दिलेल्या प्रश्नरूप 'सद्गुरूसंवादा'चीही मांडणी

केली.

आपल्या गुरुजनांचे स्मरण ललितलेखांच्या स्वरूपात 'माझे गुरुकुल' मध्ये 'वदिं'नी केले. हा ग्रंथ त्यांच्या अमृत महोत्सवाच्या कार्यक्रमात मी १९९८ मध्ये 'सोऽहम् प्रकाशना'तर्फे प्रसिद्ध केला. धर्मानिष्ठ पित्यापासून ते साक्षात्कारी मोक्षगुरूंपर्यंत साऱ्यांचे संस्मरण करण्याचे भाग्य लाभल्याने 'वदि' समाधान पावले. 'मना सज्जना' मधून स्वतःच स्वतःला सदाचाराची शिकवण कशी दिली हेही त्यांनी अभ्यासकांना समजावले.

वाङ्मयाचा, साहित्याचा अभ्यास, वाङ्मयेतिहास, काव्यविचाराची सखोल साधना, संशोधन, नाट्यविचार, संगीत सौभद्रपासून सुरू झालेला हा 'वदिं'चा प्रवास अखेर संतसाहित्याच्या वाटेने आर्वीकर-क्षीरसागर यांच्या सद्‌गुरूंच्या कृपेने ज्ञानेश्वर-तुकारामांपर्यंत झाला. आजच्या धर्माविषयीच्या जनमानसातील अज्ञानामुळे कल्पना कशा 'शाश्वत' व 'नित्यनूतन' आहेत, हे ते सांगू शकले. अशा या एका समीक्षकाचा हा प्रवास २५ ऑगस्ट २००१ ला संपला. वदि 'त्या-पार'चे झाले !

'जो जो जयाचा भेटला गुण। तो तो गुरू केला त्या जाण॥' या मार्गावर ज्ञानसाधना करीत स्वतःबरेबरच विद्यार्थ्यांच्या काही पिढ्यांचा, लोकपीठाद्वारे समाजाचा विकास साधण्यात साह्यभूत होत 'वदिं'नी जे आपल्याला दिले ते स्मरत, त्यांच्या उपलब्ध साहित्यातून, अभ्यासांती स्वतःचे उन्नयन आपण करू शकलो तर ती त्यांना वाहिलेली खरी श्रद्धांजली-आदरांजली ठरेल. त्यांची 'पूर्णाहूती' सर्वार्थाने लौकिक-पारमार्थिक अर्थाने पूर्ण होईल, हे एवढे आमच्या हातून घडो एवढीच प्रार्थना.

॥ गुरुदेवेभ्यो नमो नमः॥

■

जयंत वष्ट
९, कमलकुंज, सवितानंद सोसायटी, आनंदनगर, सिंहगड रोड, पुणे ५१.

अनुक्रमणिका



# क्रांतिकारक संशोधक : कै. प्रो. श्रीधर रंगनाथ कुळकर्णी

## (१८ डिसेंबर १९१६ : ११ सप्टेंबर २००१)

पद्माकर दादेगावकर

❑

महाराष्ट्राच्या बाहेर, हैद्राबादमध्ये राहून संशोधन-लेखनाची अखंड साधना केलेल्या डॉ. श्रीधररावांना आदरांजली वाहण्यासाठी योजिलेल्या या लेखाचे शीर्षक 'क्रांतिकारक संशोधक' असे मी जाणीवपूर्वक दिले आहे. पूर्वायुष्यात ते भारतीय स्वातंत्र्यलढ्यात निष्कामपणे सहभागी झालेले सशस्त्र क्रांतिकारक होतेच; पण उत्तरायुष्यातील विविध विषयांमधील संशोधनाने बहरलेल्या काळातही त्यांनी केलेले बहुसंख्य लेखन त्या त्या क्षेत्रात क्रांतिकारक ठरावे असेच होते. डॉ. उषा जोशी यांनी म्हटले आहे त्याप्रमाणे, "श्रीधररावांनी यथाकाल, यथाक्रम... एकेका विषयावर ग्रंथ लिहिला आहे. त्यात आवर्जून सांगावयाचे म्हणजे त्या त्या विषयापुरता तो ग्रंथ प्रमाणग्रंथ आहे. त्यापूर्वी त्या विषयावर मराठीत ग्रंथलेखनच नाही. म्हणजे त्यातल्या ज्ञानशाखेचे ते मूळ रूप आहे..बीजरूप आहे." (पंचधारा ३९:२-३, जुलै-डिसेंबर १९९६, पृ. १०६) मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांचा सुमारे हजार वर्षांचा कालपट आपल्या संशोधनातून उलगडून दाखवताना त्यांनी अनेक नवे सिद्धांत मांडले, अनेक नव्या विचारदिशा दाखविल्या. अनेक नवे अनुबंध प्रस्थापित केले. मुख्य म्हणजे भारतीयतेच्या व्यापक पटावर मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृतीचे संदर्भ तपासण्याची नवी दृष्टी मराठीच्या संशोधकांना दिली. हेही कार्य क्रांतिकारकच आहे आणि म्हणूनच त्यांना 'मी क्रांतिकारक संशोधक' असे म्हटले आहे.

श्रीधररावांच्या लौकिक आयुष्यासंबंधी नोंदविण्यासारखी आणखी एक लक्षणीय बाब म्हणजे त्यांच्या ८५ वर्षांच्या आयुष्याचे सरळ सरळ दोन कप्पे करता येतात. पहिला कप्पा १९५१ पर्यंतचा, म्हणजे वयाच्या पस्तिशीपर्यंतचा आणि पुढचा पन्नास वर्षांचा कप्पा १९५१ ते २००१ पर्यंतचा. (इतिहासासाठी येथेच नोंद करून ठेवतो. त्यांचा जन्म १८ डिसेंबर १९१६ चा आणि मृत्यू ११ सप्टेंबर २००१ सालचा.) (त्याच दिवशी अमेरिकेतील जागतिक व्यापार-केंद्राच्या दुहेरी शिखर-इमारती दहशतवादी हल्ल्यात उद्ध्वस्त झाल्या हे कोण विसरेल?) श्रीधरराव आपल्या आयुष्याच्या पहिल्या कप्प्यात जे जीवन जगले, त्याचा दुसऱ्या कप्प्यातील जीवनाशी सुतराम संबंध दिसत नाही. त्याबद्दल बोलण्यासही ते अनुत्सुक असत. या दृष्टीने एकाच जन्मात ते जणू दोन वेगवेगळी आयुष्ये जगले असे म्हणता येईल. १९५१ पर्यंतचे त्यांचे आयुष्य दारिद्र्य, अपमान, काबाडकष्ट, स्वातंत्र्य चळवळीत सोसलेल्या हालअपेष्टा, तुरुंगवास आणि एकूणच अनिश्चितता यांनी भरलेले असे वेगवान व वादळी आहे. त्या मानाने १९५१ साली हैदराबादच्या उस्मानिया विद्यापीठात नोकरीला लागल्यानंतरचे त्यांचे आयुष्य एका निश्चित संथ गतीने व दिशेने जाणारे, प्रापंचिक सुखासमाधानाचे, लौकिक यशाचे, वाङ्मयीन

कर्तृत्वाचे व मानसन्मानांचे आहे.

श्रीधररावांच्या पूर्वायुष्यातील दुर्दैवाचे दशावतार त्यांच्या बालपणीच सुरू झाले. वडील लवकरच वारले आणि या बहीण-भावंडांना मामाशिवाय आश्रय उरला नाही. त्या काळातल्या बहुसंख्य मध्यमवर्गीय ब्राह्मण कुटुंबाप्रमाणे दारिद्र्य पाचवीलाच पुजलेले, पण शिकण्याची महत्त्वाकांक्षा तेवढीच प्रज्ज्वलित. त्यामुळे श्रीधरराव एका सकाळी जे घरातून निघून गेले ते शिक्षणाचे केंद्र असलेल्या औरंगाबादला येऊनच थांबले. परिस्थितीचे चटके सहन करीत, नशिबाच्या थपडा खात, वाऱ्यावर हेलकावे खात जाणाऱ्या पानासारखे कधी औरंगाबाद, कधी पेडगाव, कधी हिंगोली, कधी परभणी, कधी नागपूर तर कधी हैदराबाद अशी शिक्षणासाठी फरफट त्यांनी सहन केली. हाती शिदोरी होती जाज्ज्वल्य बुद्धिमत्तेची, प्रचंड आत्मविश्वासाची आणि त्याहून उत्कट अशा चिवट आशावादाची. या गुणांची पारख असणारे शिक्षक आणि कदर करणारे सहृदय हितचिंतक यांच्यामुळे या काळातल्या यातना थोड्याशा सुसह्य झाल्या असतील आणि निराशेच्या अंधारात माणुसकीचा मिणमिण प्रकाश दिसला असेल तेवढाच. पण तेवढा आधार चिवट जीवनेच्छा असलेल्या या रोपट्याला पुरेसा होता. त्याच आधारावर उस्मानिया विद्यापीठाच्या बी.ए.च्या परीक्षेत त्यांनी अतिशय दैदिप्यमान यश मिळविले आणि उच्च शिक्षणासाठी तत्कालीन निजाम शासनाने ठेवलेली शिष्यवृत्ती पटकावली. त्यावेळी उस्मानिया विद्यापीठात मराठीत एम.ए. करण्याची सोय नसल्यामुळे श्रीधररावांची रवानगी नागपूरला झाली. त्यावेळी स्वातंत्र्य चळवळीचे वारे जोरदार वाहात होते. श्रीधररावांमधला देशभक्त आणि विद्यार्थी यांच्यात प्रचंड द्वंद्व चालू होते. जेमतेम वर्षभरातच विद्यार्थ्याचा पाडाव झाला आणि देशभक्त श्रीधररावांनी शिक्षण सोडून स्वातंत्र्यसंग्रामात स्वत:ला झोकून दिले. जुलमी निजामी राजवट आणि बळाचा पाशवी प्रयोग करण्यास मागेपुढे न पाहणारी इंग्रज राजवट या जात्यात श्रीधररावांचा जीव भरडून निघू लागला. त्यात कधी अटका झाल्या, कधी पोलिसांच्या हातावर तुरी देण्यात ते यशस्वी झाले, कधी हाती शस्त्र घ्यावे लागले, कधी लेखणी. प्रसंगी भूमिगत व्हावे लागले, वेषांतर करावे लागले, मुळातलीच तल्लख बुद्धी येथेही उपयोगी पडली. मुस्लिम-ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना त्यांनी वारंवार चकविले. या काळात ते अनेक नावांनी वेगवेगळी व्यक्तिमत्त्वे धारण करीत दोन्ही सत्तांना संत्रस्त करीत राहिले. शेवटी तर अशी पाळी आली की त्यांना जिवंत वा मृत पकडून देणाऱ्यास त्या काळी हजारभर रुपयांचे बक्षीस जाहीर करावे लागले. पण सशस्त्र क्रांतीबरोबरच श्रीधररावांनी विधायक कार्यही तेवढेच मोलाचे मानले. आचार्य जावडेकरांनी या पातळीवर त्यांचे प्रबोधन केले. मग त्यांच्या सोबतीने पुण्याहून प्रकाशित होणाऱ्या 'लोकशक्ती' या नियतकालिकाचे उपसंपादक म्हणून श्रीधररावांनी लेखणीही शस्त्रांइतकीच जोमाने चालविली. आणखी पुढे त्यांनी औरंगाबादच्या 'मराठवाडा' मध्येही महत्त्वाच्या जबाबदाऱ्या सांभाळल्या व पत्रकार म्हणूनही उत्तम नाव कमावले. स्वातंत्र्य-चळवळीत स्वत:ला झोकून दिलेल्या कुणाही व्यक्तीने कोणतेही काम हलके वा वर्ज्य मानले नाही. श्रीधररावही याला अर्थातच अपवाद नव्हते. डेक्कन आयुर्वेदाश्रम, खादी ग्रामोद्योग यांत तर त्यांनी कामे केलीच, पण ग्रामोद्योग चर्मालयाचे काम करीत असताना डोक्यावर चपला-

बुटांचे जोड वाहत घरोघर नेऊन विकण्याचे काम करतानाही त्यात श्रीधररावांनी कधी कमीपणा वाटून घेतला नाही. या चळवळीत पडतील ती कामे करताना वेगवेगळ्या क्षेत्रांतील मंडळींशी त्यांची जिव्हाळ्याची नाती जडली. त्यात स्वामी रामानंदतीर्थ, डॉ. मेलकोटे, दिगंबरराव बिंदू, पी.व्ही. नरसिंहराव ही जशी निजाम प्रांतातली मंडळी होती, तसेच मराठवाड्याचे शंकरराव चव्हाणांसारखे मित्रही होते; जावडेकरांसारखे गुरू होते आणि पुण्यामुंबईकडील ना. ग. गोरे, एस्. एम्. जोशी, रावसाहेब पटवर्धन, काकासाहेब गाडगीळ, शंकरराव देव, यशवंतराव चव्हाण यांच्यासारखे भिन्न भिन्न राजकीय-सामाजिक दृष्टिकोण असणारे पुढारीही होते. या सर्वांच्या खांद्याला खांदा लावून श्रीधररावांनी स्वातंत्र्यलढ्यात काम केले. सशस्त्र उठाव आणि विधायक कार्य या दोन्ही आघाड्यांवर त्यांनी या काळात स्वत:ला असे काही झोकून दिले होते, की एकदोनदा साक्षात् त्यांना मृत्यूचाच सामना करावा लागला. पण श्रीधरराव कोणत्याही प्रसंगी डगमगले नाहीत अथवा आपल्या ध्येयावरील त्यांची दृष्टी किंचितमात्रही ढळली नाही. मात्र स्वातंत्र्याचे उद्दिष्ट साध्य होताच त्यांनी राजकारण, राजकीय चळवळ आणि राजकीय पुढारी या साऱ्यांकडे अतिशय निर्भयपणे आणि कायमची पाठ फिरविली. जणू त्या क्षेत्राशी आपला कधी कोणताच संबंधच नव्हता, इतके ते अलिप्त झाले. चळवळीत त्यांनी जे हाल भोगले, तुरुंगवास सोसले, त्याग केले त्याचा काही मोबदला पदरात पाडून घ्यावा, हा विचारही त्यांनी स्वत:ला स्पर्शू दिला नाही. त्या काळातील आपल्या कामाचा साधा उच्चारही करण्याचे त्यांनी शक्यतोवर नंतरच्या आयुष्यात टाळले.

राजकीय जीवनापासून श्रीधरराव बुद्ध्या दूर झाले, पण लोकांसाठी कार्य करीत राहण्याचा त्यांचा स्वभाव त्यांना स्वस्थ बसू देईल तर ना! त्यांनी अनेक सामाजिक संस्था स्थापन केल्या होत्या त्या वर्धिष्णु केल्या. मराठवाडा साहित्य परिषद आणि तिचे मुखपत्र 'प्रतिष्ठान' यांची उभारणी आणि संवर्धन करण्यात पुढे होते ते श्रीधररावच. राज्यपुनर्रचनेनंतर मराठवाडा साहित्य परिषद औरंगाबादला गेली, अनेक कार्यकर्ते महाराष्ट्र हीच आपली कार्यभूमी मानून आंध्रप्रदेश सोडून तिकडे चालते झाले. इथे मागे राहिलेल्या मराठी जनांची भाषा, साहित्य, संस्कृतीविषयक भूक भागविण्यासाठी मराठी साहित्य परिषद (आंध्र प्रदेश) या संस्थेची प्रतिष्ठापना आणि तिचे मुखपत्र 'पंचधारा' चे संपादन-संवर्धन या कार्यातही श्रीधररावच आघाडीवर होते. हैदराबाद येथल्या मराठी ग्रंथ संग्रहालयाचे कार्यवाहपद दीर्घकाळ सांभाळून त्यांनी त्याचा कारभार लोकोन्मुख कसा होईल ते बघितले. येथल्या ख्यातनाम विवेकवर्धिनी शिक्षण संस्थेच्या कार्यकारी मंडळावरही त्यांनी अखेर अखेरपर्यंत कार्य करून त्याही संस्थेला आपल्या अनुभवाचे समृद्ध भांडार उपलब्ध करून दिले. लोकांसाठी कार्य करणारी संस्था मग ती जुन्या शहरातली, शालिबंड्यावरची मराठी संस्था असो की एखादी उर्दू वा तेलुगु संस्था असो, श्रीधरराव कोणत्या ना कोणत्या नात्याने तिथे गुंतलेले असावयाचेच. मराठी, संस्कृत, इंग्रजी, हिंदी, दखनी, उर्दू, तेलुगु आदि अनेक भाषांवर प्रभुत्व असल्यामुळे कोठल्याही भाषिक समाजाला ते आपल्यातलेच एक वाटत.

१९५१ साली श्रीधररावांच्या जीवनाचे दुसरे पर्व सुरू झाले. उस्मानिया विद्यापीठात ते

मराठीचे प्राध्यापक म्हणून नोकरीला लागले. इथे त्यांनी स्वतःला अध्यापनासोबतच अध्ययनाच्याही क्षेत्रात सर्वस्वी झोकून दिले. उत्तम शिक्षक म्हणून तर त्यांनी लगेच लौकिक मिळविलाच, पण अवघ्या पाच वर्षांतच पीएच.डी. साठी प्रबंध सादर करून उस्मानिया विद्यापीठा'तील मराठीचे पहिले पीएच.डी. होण्याचा मानही पटकाविला. यथावकाश प्रपाठक (१९६१), विभागप्रमुख (१९६४) या पदांची माळ त्यांच्या गळ्यात पडत गेली. उस्मानिया विद्यापीठाच्या सुवर्णमहोत्सवाच्या निमित्ताने पण खरे तर या विद्यापीठातल्या मराठी विभागाचे कार्य पाहून तत्कालीन महाराष्ट्र शासनाने उस्मानिया विद्यापीठाला मराठीच्या अध्यासनासाठी तीन लाख रुपयांची देणगी दिली. १९७० साली या अध्यासनावर श्रीधररावांची पहिले प्रोफेसर म्हणून नियुक्ती झाली.

लौकिक यशाची अशी शिखरांमागून शिखरे पादाक्रांत करीत असतानाच श्रीधरराव आपले वाङ्मयीन कर्तृत्वही नवनव्या झळाळीने उजळून टाकीत होते. आज त्यांच्या नावावर सुमारे तीस स्वतंत्र-संपादित ग्रंथ, मराठी-इंग्रजीसह विविध भाषांमध्ये लिहिलेले आणि मान्यवर देशी-परदेशी नियतकालिकांमध्ये प्रकाशित झालेले सुमारे पाऊणशे शोधनिबंध, पंचवीस ते तीस ललित लेख आणि चाळीसएक व्यक्तिचित्रे आहेत. 'भावार्थ रामायण', 'समग्र राजवाडे' यांसारख्या महत्त्वाच्या ग्रंथांच्या संपादन-कार्यात त्यांचा सहभाग राहिलेला आहे. अनेक महत्त्वाच्या ग्रंथांना त्यांच्या चिकित्सक प्रस्तावना आणि डोळस पुरस्कार लाभले आहेत. त्यांनी नाटक लिहिले, संगीतिका लिहिल्या, बालवाङ्मयही निर्माण केले. 'नवरात्र संपले' हे त्यांचे आत्मचरित्र म्हणजे स्वतःच्याच जीवनाच्या काठावर उभे राहून निर्भय वृत्तीने केलेले कठोर परीक्षण आहे. श्रीधररावांनी कविताही लिहिली आणि 'काव्य आणि कविता' हा त्यांचा अल्ताफ हुसेन हाली यांच्या 'मुकदमा शेर-ओ-शायरी'चा मराठी अनुवाद दिल्लीच्या साहित्य अकादमीतर्फे प्रकाशित झालेला आहे. संगीत आणि आयुर्वेद हे त्यांच्या व्यासंगाबरोबरच आवडीचे छंदही होते.

पण श्रीधरराव खरे रमले ते प्राचीन-मध्ययुगीन मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृतीच्या संशोधनातच. या कार्यात त्यांनी अनेक लहान-मोठी हस्तलिखिते शोधून, संपादून जशी प्रकाशित केली, तशीच या क्षेत्रांवर नवे प्रकाशझोत टाकणारी स्वतंत्र पुस्तकेही लिहिली.

त्यांच्या संशोधन-संपादनांमध्ये उत्तरगीता (१९५७), चंद्रावळी आख्यान (१९६०), अद्वैतामृत, पंचमुद्रा (१९६८), श्री नेमिनाथ भवांतर (१९६९), सुगमबोध (१९७१) बखर ब्राह्मणी बादशाहीची (१९७२) यांच्याखेरीज 'रसकौमोदि' आणि 'संगीतदर्पण' या दोन महत्त्वाच्या संपादनांचा खास निर्देश करावा लागेल. 'रसकौमोदि' हा विठ्ठल गलंडकृत आयुर्वेदावरील शके १२२२ चा ग्रंथ व त्यावरील शके १४५६ ची मराठी टीका यांचे हे एक आदर्श संपादन आहे. भारतीय वैद्यकशास्त्रातील रसवैद्यकी या शाखेचा उगम, तेराव्या शतकापर्यंतचा या शास्त्राचा विकास, विठ्ठल गलंडाच्या ग्रंथाची वैशिष्ट्ये आणि भाषिक अभ्यास या विविध अंगांनी या ग्रंथांचे समालोचन करणारी अभ्यासपूर्ण प्रस्तावना श्रीधररावांनी या संपादनास जोडली आहे. प्राचीन वाङ्मयाच्या अभ्यासकांनी या संपादनाचे भरघोस स्वागत

केलेच, पण आयुर्वेदाचे उपयोजन करणाऱ्या अनेक वैद्यांनी या उपक्रमाचे मुक्तकंठाने कौतुक केले. 'संगीतदर्पण' हा दामोदर पंडिताचा सतराव्या शतकातील एक मान्य संस्कृत ग्रंथ. या ग्रंथावरील कुणा अज्ञात भाष्यकाराची मराठी टीका मिळवून ती श्रीधररावांनी आपल्या अभ्यासपूर्ण प्रस्तावनेसह प्रसिद्ध केली आहे. मराठी टीका ही मूलत: अनुवादस्वरूप असली आणि म्हणून फारशी महत्त्वाची नसली तरी या निमित्ताने श्रीधररावांनी भारतीय संगीताच्या प्राचीन परंपरेचा घेतलेला वेध आणि त्याची महाराष्ट्रातील विविध लोकपरंपरांशी असलेली सांगड स्पष्ट करीत महाराष्ट्रात अक्षुण्णपणे चालत आलेल्या संगीत साधनेचे जे चित्र श्रीधररावांनी उभे केलेले आहे ते त्यांच्या विलक्षण बुद्धिमत्तेचा अलौकिक पल्ला दाखविण्याबरोबरच अनेक प्राप्त गैरसमजुती दूर करीत या विषयाच्या संशोधनातील नव्या वाटा मोकळे करून देते.

संहिता-संपादन आणि पाठचिकित्सा हे त्यांच्या आवडीचे विषय होते. त्यामुळे आपल्या संपादनांद्वारे त्यांचा आदर्श वस्तुपाठ घालून देतानाच श्रीधररावांनी त्यासंबंधी काही मौलिक सैद्धांतिक लेखनही केले आहे. 'पाठचिकित्सा : शास्त्र व व्यवहार' (नवभारत, ऑगस्ट १९६८), 'नामदेव गाथेची संहितानिश्चिती' (नामदेव दर्शन, संपा: वि. वा. रेळेकर व इतर, नामदेव समाजोन्नती परिषद, १९७०), ''संहिता संपादनाच्या नव्या दिशा'' (भाषा व साहित्य : संशोधन, खंड २, संपा: वसंत जोशी व इतर, म. सा. परिषद, पुणे १९८५), 'डॉ. कोलते यांची वैशिष्ट्यपूर्ण संपादनपद्धती' (संशोधनाची क्षितिजे : डॉ. वि. भि. कोलते अमृत महोत्सव गौरव ग्रंथ, संपा: भा. ल. भोळे, अमेय, नागपूर, १९८५) हे त्यांचे लेख या क्षेत्रातील अभ्यासकांना दिशा दाखवणारे व प्रेरणा देणारे आहेत. असे विविध विषयांवरचे असंख्य स्फुटलेख त्यांनी सातत्याने लिहिले आहेत. हे स्फुटलेख कित्येकदा त्यांच्या एकेका ग्रंथांचे पूर्वावतार असतात, असेही दिसून येते.

उदाहरणार्थ, त्यांच्या 'ओवी ते लावणी' (का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था, १९९४) या ग्रंथातील प्रतिपाद्याचे पूर्वावतार म्हणा वा बीजे म्हणा - अनेक स्फुटलेखांमधून आढळतात. ''समर्थांनी धन्य केलेली 'गायनी कला' '' (पंचधारा २:१, १९६०), 'महाराष्ट्राची संगीत परंपरा' (युगवाणी, जाने-फेब्रु. १९७०), 'संतांची संगीतसाधना' (मराठी स्वाध्याय संशोधन पत्रिका, मराठी विभाग, उस्मानिया विद्यापीठ', (यापुढे 'मस्वाप' या संक्षेपाने उल्लिखित) १९७०), 'दाक्षिणात्य संगीत पद्धतीचे मराठी वाग्गेयकार' (मस्वाप, १९८५), 'ज्ञानेश्वरी : एक गीतप्रबंध' (मस्वाप, १९८७), 'मुक्त संगीतसंवाद' (परीक्षण) (पंचधारा ३२:४, १९९०), 'संगीतकला आणि मध्ययुगीन मराठी साहित्य' (पंचधारा, ३३:१, १९९०), 'नादब्रह्माची उपासना व साधुसंत' (प्रतिष्ठान) आणि 'संगीतदर्पण' हा संपादित ग्रंथ असा सुमारे तीन दशके श्रीधररावांचे या विषयासंबंधी चिंतन-स्फुटलेखन चालले होते असे दिसते. दुसरे उदाहरण 'दखनी भाषा: मराठी संस्कृतीचा एक आविष्कार' या ग्रंथाचे देता येईल. 'दखनी कवींनी गायिलेला शिवप्रताप' (मराठवाडा, दिवाळी अंक १९६१) आणि 'दखनी उखाणे' (पंचधारा, ३:१, १९६१) या प्राथमिक लेखांपासून सुरुवात करून या विषयात अधिकाधिक खोल अवगाहन करीत असताना श्रीधरराव फुटकळ लेखांमधून आपली प्रमेये विचारवंतांपुढे ठेवीत

हाते. 'मराठीच्य: सांस्कृतिक परंपरेत झालेला दखनी भाषेचा उद्‌भव' (मस्वाप, १९६७) "The Missing Link Between Khadi Boli and Nagari Hindi' (Osmania University Golden Jubilee Vol., 1968), 'दखनीचा मराठी पिंड' (मस्वाप १९७१), "Influence of Marathi on the structure of Dakhani Language' (University of Bombay Journal, November 1972), 'दखनवी साहित्याचे अंतरंग' (पंचधारा ३४:२-३, १९९२, आणि शेवटी 'दखनी भाषेची ध्वनिव्यवस्था' (पंचधारा ३७:३, १९९४) अशा लेखांमधून या पुस्तकाचा आकार उमलत गेला असे दिसून येते. अशा लेखनपद्धतीचा एक परिणाम असा होतो की त्यातील प्रतिपाद्यांना भक्कम चिंतनाचा आणि सबळ संदर्भाचा आधार मिळते. यामुळेच श्रीधररावांचे असे ग्रंथ त्या त्या अभ्यास क्षेत्रातील मैलाचे दगड आणि विश्वसनीय प्रमाणग्रंथ ठरले आहेत.

श्रीधररावांनी अनेक स्वतंत्र ग्रंथ लिहिले असले तरी स्थलसंकोचास्तव ह्या सर्वांचा विचार येथे मला करता येणार नाही. पण त्यातले काही ग्रंथ मुळातच इतके महत्त्वाचे आहेत की त्यांचा संक्षिप्त का होईना पण परामर्श घेतल्याशिवाय त्यांच्या कर्तृत्वाचे मूल्यमापन पूर्ण होणारच नाही.

ते उस्मानिया विद्यापीठातील पहिले पीएच्.डी. आहेत याचा वर उल्लेख येऊन गेलाच. या अभ्यासावर आधारित त्यांचा पहिला ग्रंथ आहे, 'नाथांचा भागवतधर्म' (एकनाथ संशोधन मंदिर, औरंगावाद, १९५८). त्याला केसरी ट्रस्टचा साहित्यसम्राट न. चिं. केळकर पुरस्कार (१९५८) मिळाला होता. ग्रंथ प्रकाशित होताच त्यावर मराठवाडा (१५ जून १९५८, लेखक: नाव नाही), मौज (९ ऑगस्ट १९५८, ल. ग. जोग), The Hindu (9th September 1958, M. B. Pandit), केसरी (१२ ऑक्टोवर १९५८, ज. स. करंदीकर), आकाशवाणी नागपूर (१० जून १९५९, महागावकर) आदींचे सविस्तर आणि अनुकूल अभिप्राय आले. भागवतधर्माच्या संकल्पनेची बीजे ऐतिहासिक दृष्टीने शोधत श्रीधरराव थेट वेदांतील ऋत संकल्पनेपर्यंत तिचे धागेदोरे पोचतात असे सिद्ध करून दाखवतात. उपनिषदांमधील हरिहरऐक्य संकल्पना, ब्राह्मणातील पुरुषमेधाच्या संकल्पनेत अनुस्युत असलेली विराट समाजपुरुषाची धारणा, महाभारतातील गीता आणि नारायणी आख्यान यातून कर्म, भक्ती आणि ज्ञान यांचा योग सांगणारी ब्रह्मविद्या, त्यातून पुढे साकार झालेली भक्तीची चळवळ व त्याद्वारे संतांचे समाजोन्नतीचे कार्य एवढ्या व्यापक पटावर ते भागवतधर्माचे विवेचन करतात. 'हे विश्वचि माझे घर' ही ऋतसंकल्पना स्पष्ट करीत भक्तीला निष्काम कर्मयोगाची जोड देऊन मोक्षप्राप्तीनंतरही साधकाने स्वकर्म विरत राहून समाजास मार्ग दाखविला पाहिजे, निष्क्रिय संन्यास त्यासाठी उपयोगाचा नाही असा भागवतधर्म नाथांनी मांडून स्वकालीन धर्मग्लान समासास चैतन्य दिले, असा निष्कर्ष श्रीधररावांनी या ग्रंथात काढला आहे. या अभ्यासात त्यांचे संस्कृत-मराठीचे प्रगाढ ज्ञान, विश्लेषक बुद्धी, चिकित्सक दृष्टिकोण, विचारगर्भ भाषाशैली आणि शोधकासाठी आवश्यक असलेला चिवटपणा यांचे मनोज्ञ दर्शन घडते.

''प्राचीन मराठी गद्य : प्रेरणा आणि परंपरा'' (सिंधु पब्लिकेशन्स, मुंबई १९७०) या

ग्रंथात त्यांनी प्राचीन मराठी गद्याचा प्रेरणास्त्रोत निश्चित करण्याचे महत्त्वाचे कार्य केले आहे. ते करताना साहित्यात विशिष्ट काळी विशिष्ट प्रवाहच का अवतरतात याचे उत्तर वाङ्मयेतिहासात सापडत नाही, ते समाजेतिहासात सापडते; कारण साहित्यकृतीचा आकृतिबंध आणि स्वरूप सामाजिक गरजांमधून साकार होत असतात असे समाजशास्त्रीय सूत्र मांडून त्या आधारे प्राचीन गद्याची कथाप्रधान साहित्य, चरित्रग्रंथ, बखर वाङ्मय, आज्ञापत्र आणि ऐतिहासिक पत्रव्यवहार अशी विविध रूपे आहेत असे दाखविले आहे. या ग्रंथाला १९७१ सालचे महाराष्ट्र राज्य पारितोषिक मिळाले. याही ग्रंथाची मराठीच्या अभ्यासकांनी उचित दखल घेतली. माधव मनोहरांनी (नवशक्ती, मार्च १९७०) ''साहित्यातील न्यून ते पुरते करू पाहणारी नवी विचक्षणा'' असा गौरव केला, तर सरोजिनी वैद्यांनी (महाराष्ट्र टाईम्स, ३१ मे १९७०) ''वादग्रस्त पण महत्त्वाचे प्रतिपादन'' असे म्हणत विरोध प्रकट केला. याशिवाय भालचंद्र फडके (वीणा, मार्च १९७०), तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (नवभारत, मे १९७०), पुन्हा माधव मनोहर (आलोचना, नोव्हेंबर १९७०), मु. श्री. कानडे (केसरी, जाने १९७१) आणि मा. ना. आचार्य (सत्यकथा, ऑगस्ट १९७१) आदी मान्यवरांनी आवर्जून या वेगळ्या प्रयत्नाची दखल घेतली.

प्राचीन गद्याकडे अशा अभिनव परिप्रेक्ष्यातून पाहणाऱ्या श्रीधररावांनी त्यानंतर मध्ययुगीन मराठी पद्याकडे आपला मोहरा वळवत त्याचेही आणखीच वेगळ्या दृष्टीकोणातून अवलोकन केले. 'ओवी ते लावणी' (का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था, धुळे, १९९४) या ग्रंथातून प्राचीन मराठी-विशेषेकरून स्फुट रचनांचे तीन आकृतिबंधांत विभाजन करता येते आणि हे तीन आकृतिबंध संगीताच्या आधारावर उदयाला आले असे या ग्रंथाचे प्रतिपाद्य आहे. लोकसंगीतावर आधारित ओव्या, आरत्या, भूपाळ्या, अभंग, भारुडे, एवढेच नव्हे तर गौळणी आणि लावण्या हे प्रकार आहेत. ललित संगीताच्या आधाराने बहरलेले मनोरंजनात्मक नागर साहित्य राजदरबाराच्या आश्रयाने वाढले, तर शास्त्रोक्त संगीताने नाट्यात्म घाट असलेले साहित्यप्रकार दिले असे प्रतिपादन करून आपल्या ग्रंथाचा समारोप करीत श्रीधरराव म्हणतात, ''या देशातील सामाजिक जीवनात वेळोवेळी सांस्कृतिक पुनरुज्जीवनासाठी झालेल्या चळवळीत भारतीय संगीत आणि प्राचीन मराठी संतसाहित्य यांची भूमिका अत्यंत निर्णायक स्वरूपाची होती, हे सत्य प्राचीन मराठी पदबंधांचा उद्‌गम-विकासाचा शोध घेताना नजरेत भरते. या शोधात गौळण, विराणी, भारूड, पोवाडा आणि लावणी हे पदबंध अगदी वेगळे दर्शन देऊन जातात.''

प्राचीन मराठी गद्य-पद्याचे असे नवदर्शन घडविणारे श्रीधरराव जेव्हा भाषाविषयक लेखन करतात, तेव्हा त्यातही अशा क्रांतिकारक नवविचारांचाच पाठपुरावा करताना दिसतात.

''तेलंगणातील आरे मराठी समाज: भाषा आणि संस्कृती' (महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ, मुंबई १९८७) आणि 'दखनी भाषा: मराठी संस्कृतीचा एक आविष्कार' (राज्य मराठी विकास संस्था, मुंबई १९८८) ही त्यांची या क्षेत्रातली दोन महत्त्वाची पुस्तके. पहिल्याला महाराष्ट्र राज्याचा १९८८ चा पुरस्कार मिळाला, तर दुसऱ्याला महाराष्ट्र फाऊंडेशनचा



अनुक्रमणिका

१९९९ चा पुरस्कार.

तेराव्या शतकात महाराष्ट्रातून येऊन तेलंगणात स्थायिक झालेल्या तेलुगु भाषा आणि संस्कृतीशी एकरूप झालेल्या आणि तरीही आपल्या सातशे वर्षांपूर्वीच्या मायमराठीचे मूळ रूप घरातून अजूनही जतन करणारा अरे मराठा समाज हा भाषाशास्त्रज्ञांसाठी एक चमत्कारच आहे. निवृत्तीनंतर श्रीधररावांनी खेड्यापाड्यांमधून मैलोगणती भटकंती करीत आवश्यक तो डाटा (Data) गोळा केला आणि त्याआधारे या ग्रंथाची मांडणी केली. समाजशास्त्रीय आणि भाषाशास्त्रीय अंगांनी केलेल्या या पाहणीतून अरे मराठा समाज, त्यांची भाषा, त्यांची संस्कृती यांचे अनोखे दर्शन तर घडतेच, पण मराठीच्या भाषिक विकासातील एक टप्पाही अधिक स्पष्ट होतो. अरे ही बोली आणि तिची ध्वनिव्यवस्था यांच्या अभ्यासाद्वारे ती अपभ्रंशाचे एक उत्क्रांत रूप आहे या निष्कर्षावर श्रीधरराव येतात. अपभ्रशांचे मराठीत रूपांतर होत असतानाचे भाषेचे एक गोठलेले स्वरूप या बोलीतून गवसते, असे श्रीधरराव म्हणतात. डॉ. शोभा देशमुख म्हणतात (मस्वाप, १९९७, पृ. २०) ''महाराष्ट्री प्राकृतापासून ते १३ व्या शतकातील मराठी वाङ्मयापर्यंतचे सुमारे हजार बाराशे वर्षांचे भाषिक सातत्य दर्शविणारी सामग्री आणि भाषिक प्रवाहाची अखंडता प्रस्थापित करणारे पुरावे या संशोधनातून उपलब्ध झाले.''

दखनी भाषेविषयीचा श्रीधररावांचा ग्रंथ संपूर्ण भारताच्या पटावरील राजकीय, सामाजिक घडामोडीत ११ ते १५ या पाच शतकात झालेली घालमेल आणि त्यातून उदयाला आलेली आजची राष्ट्रभाषा हिंदी हिच्या उद्गमामागची मराठीची पुण्याई स्पष्ट करणारा आहे. श्रीधरराव स्वत:च या ग्रंथात म्हणतात त्याप्रमाणे, ''मराठी साहित्यातील प्रवाहांचा अनुबंध देशातल्या अन्य भाषांशी कुठेतरी जोडला गेलेला आहे. हे अनुबंध ध्यानात न घेता महाराष्ट्रातील सांस्कृतिक जीवन आणि मराठी साहित्यातील प्रवाह यांच्यासंबंधी काढलेले निष्कर्ष एकांगी ठरण्याचा दाट संभव असतो... प्राचीन इतिहास लक्षात घेता असे आढळते की महाराष्ट्रातील वैचारिक व सामाजिक आंदोलने आणि साहित्यनिर्मिती यांना निरंतर राष्ट्रीय संदर्भ लाभलेला आहे. महाराष्ट्रात झालेला दखनी भाषेचा उद्‌भवदेखील या व्यापक संदर्भाचाच एक आविष्कार आहे.''

इस्लामी आक्रमणांनी येथील धर्म आणि संस्कृतीचाच उच्छेद मांडल्याचे पाहून त्यांच्या संरक्षणासाठी येथल्या लोकांनी सर्वसामान्यांच्या बोलभाषेतून धर्म-संस्कृतीचा व्यवहार आरंभिला. या मंडळीत नाथसंप्रदायी आणि त्यातही गोरक्षनाथ हे सर्वात अग्रभागी होते. संपूर्ण देशात आणि विशेषेकरून महाराष्ट्रात त्यांनी अद्वैत वेदान्ताच्या अभ्युत्थानार्थ बोलभाषांमधून साहित्यनिर्मिती केली. हीच दखनी भाषा होय. पुढे सूफीपंथियांनीही आपल्या पंथप्रचारार्थ हिचा सर्व भारतभर उपयोग केला. ही अपभ्रंश आणि मराठी यांच्यामधला एक दुवा ठरली. ज्ञानदेवांच्या वारकरी संप्रदायाने आणि विशेषेकरून नामदेवांनी तिला थेट पंजाब-उत्तर प्रदेशांपर्यंत पोचवली. १५ व्या शतकापर्यंत नामदेवांचे अनुसरण करीत मराठी संतमंडळी दखनी भाषेतूनही आपली रचना करीत होते. १५ व्या शतकात कबीराच्या रूपाने हिंदी साहित्याचा प्रारंभ झाल्यानंतर दखनीचे अवतारकार्य संपले; मात्र ती एक बोली म्हणून अजूनही टिकून आहे, असे संक्षेपाने या ग्रंथाचे प्रतिपाद्य सांगता येईल. याखेरीज दखनीच्या लिपीचा मुद्दाही श्रीधररावांनी

तर्कसुसंगत मुद्दे मांडून पटवून दिला आहे. श्री. द. पं. जोशी यांनी म्हटले आहे (संवादिनी (महाराष्ट्र फाऊंडेशन स्मरणिका) १९९९, पृ. ४७) त्याप्रमाणे, "...दखनीच्या संदर्भात आजच्या विद्यमान भारताला व महाराष्ट्राला विचार करायला भाग पाडेल असा एक सिद्धान्त या ग्रंथात आहे... तो म्हणजे महाराष्ट्राने राष्ट्रभाषा हिंदीला दिलेला आधार. ती सेवा मराठीने तेराव्या शतकात तशीच अठराव्या शतकातही केली. संतांनी व ग्रंथकारांनी... रचना केल्या, त्या उदात्त सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्य म्हणून. त्यांनी मराठीत व दखनीत लेखन केले. ते नामदेवांनी केले तसेच सगनभाऊ, प्रभाकरने केले. ते केले नसते तर प्रगल्भ भाषा म्हणून हिंदीचा विकास होऊच शकला नसता. नामदेवाचे माहात्म्य कबीर, दादू दयाळ, गुरूनानक यांनी मानले तर खाली दक्षिणेत शाहनुराव यानेे अठराव्या शतकात मानले. त्यामागे भाषिक व सांस्कृतिक ऐक्याची, समन्वयाची व समाजसंवर्धनाची दृष्टी होती व लोकोद्धाराची प्रेरणा होती."

श्रीधररावांचे इतर ग्रंथ - 'प्राचीन मराठी हस्तलिखिते : संशोधन आणि संपादन' (का. स. वाणी मराठी प्रगत अध्ययन संस्था, धुळे १९९४), "शिवकालीन राजनीती आणि रणनीती' (पॉप्युलर प्रकाशन, मुंबई १९९४), 'मध्ययुगीन मराठी साहित्य : एक पुनर्विचार' (राजहंस प्रकाशन, पुणे, १९९६), 'नाथपंथी ज्ञानेश्वर आणि वारकरी ज्ञानदेव' (मराठी साहित्य परिषद (आंध्रप्रदेश, हैदराबाद, १९९६) आणि 'साहित्यसेतू' (राज्य मराठी विकास संस्था, मुंबई १९९८) हेही तितकेच महत्त्वाचे आहेत.

श्रीधररावांचे अजून कितीतरी लेखन अप्रकाशित स्वरूपात पडून आहे. अनेक ग्रंथांच्या संकल्पना टिपणा-टाचणांच्या स्वरूपात बंदिस्त आहेत. त्यांच्या 'ॐ नमो आद्या' नामक ग्रंथातील पहिले प्रकरण 'पंचधारा'त (३९:२-३, जुलै-डिसेंबर १९९६, पृ. १२-१९) आम्ही प्रकाशित केले होते. या ग्रंथासंबंधी 'संपादकीया'त प्रस्तुत लेखकाने लिहिले होते, "या ग्रंथात ज्ञानेश्वरांच्या शब्दविषयक संकल्पनांची मीमांसा करण्यात आली आहे. डॉ. श्रीधररावांच्या मते संत ज्ञानेश्वरांच्या शब्दविषयक धारणांचे उगमस्थान ऋग्वेदात असून अनेक ऋचांच्या आधाराने त्यांनी हे मत मांडले आहे. ज्ञानेश्वरांच्या साहित्याला लाभलेले रंगरूप हा ज्ञानदेवांच्या शब्दविषयक संकल्पनांचाच एक आविष्कार आहे, अशी त्यांची भूमिका आहे. वेदोपनिषदे व वैदिक व्याकरण या दोहोंच्या आधाराने या विषयाची चर्चा करून 'वेद अवतरला ज्ञानेश्वरीपणे' असा निष्कर्ष डॉ. श्रीधररावांच्या या नव्या ग्रंथात मांडण्यात आला आहे. वेदांच्या संदर्भात ज्ञानेश्वरीतील शब्दशास्त्राचा हा पहिलाच अभ्यास असून त्यांच्या ग्रंथातून त्यांनी वैदिक संस्कृतीचे ज्ञानेश्वरकालापर्यंतचे सातत्य दाखविले आहे."

नव्या दिशा दाखवणारे पण त्याचवेळी परंपरेची नाळ न तोडणारे, अनाग्रही पण विपुल साधार संदर्भ देत लिहिल्यामुळे अभ्यासकास स्वीकारार्ह वाटणारे, संशोधनाने परिपूर्ण पण मुळीच रुक्ष न होणारे, विद्वत्तेचे तेज ल्यालेले पण रसिकतेमुळे सुकुमार बनलेले त्यांचे लेखन त्यांच्या जीवनाप्रमाणे आणि स्वभावाप्रमाणेच परस्परविरोधी वाटणारे पण आतून चैतन्याचा रसरशीत झरा असलेले आहे. ते खऱ्या अभ्यासकाला सतत आव्हान देणारे आहे. त्यात अनेक नव्या विषयांची बीजे त्यांनी पेरून ठेवली आहेत. त्यांचे पुष्कळ लेख असंग्रहित आहेत. काही

ग्रंथ मिळत नाहीत. या क्षेत्रात कार्य करणाऱ्या संस्थांनी, प्रकाशकांनी, मंडळांनी पुढाकार घेऊन श्रीधररावांचे समग्र प्रकाशित-अप्रकाशित साहित्य अभ्यासकांना उपलब्ध होईल, असे केले तर तीच त्यांना खरी श्रद्धांजली ठरेल.

■

डॉ. पद्माकर दादेगावकर
१/सी, ३-३-९३४/ वरलक्ष्मी अपार्टमेंटस्, कुतुबीगुडा, हैदराबाद ५०० ०२७.

---

## स्वागत

- **कल्याण मंदिर स्तोत्र :** कांतीलाल चुतर, सुंदर सन्मती साहित्य प्रकाशन.
- **श्वेत कमळ :** कृष्णा चौधरी, पूर्वा प्रकाशन, रामटेक, नागपूर.
- **गावशीव :** वि. दा. पिंगळे, पृथ्वीराज प्रकाशन, पुणे.
- **कृषी कविता :** प्रा. जवाहर मुथा, शारदा प्रकाशन, पुणे.
- **संस्कृत एकांकिका :** आर. एस. पोतदार, प्रकाशक - आर. एस. पोतदार.
- **दोन मनस्विनी :** अनु. संजीवनी मुळे, देशमुख आणि कंपनी पब्लिशर्स प्रा. लि., पुणे.
- **बृहस्पती :** द. व्यं. जहागिरदार, साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
- **विचार फुले :** रमेश पानसे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
- **तुका म्हणे :** संपादक - प्रा. डॉ. कृष्णा इंगोले, साकेत प्रकाशन, औरंगाबाद.
- **घुंगूरवाडी :** सुरेश धनगर, साकेत प्रकाशन प्रा. लि., औरंगाबाद.
- **तेथे कर माझे जुळती :** श्री. किरण जोगळेकर, अनंत प्रकाशन, कल्याण.
- **बंद झिंदाबाद :** श्री. किरण जोगळेकर, अनंत प्रकाशन, कल्याण.
- **बहिर्गोल बिग गीते :** श्री. किरण जोगळेकर, अनंत प्रकाशन, कल्याण.
- **बाळाची दुनिया :** श्री. किरण जोगळेकर, अनंत प्रकाशन, कल्याण.
- **कांगारूंची शाळा :** श्री. किरण जोगळेकर, अनंत प्रकाशन, कल्याण.
- **आरण्यक :** विभूति-भूषण बन्द्योपाध्याय, साहित्य अकादमी, मुंबई.
- **काठीचा घोडा :** सुरेश सावंत, निर्मल प्रकाशन, नांदेड.
- **नवरसाची नवलाई :** मथू सावंत, निर्मल प्रकाशन, नांदेड.
- **जगूची गोष्ट :** आशा भाजेकर, देशमुख आणि कंपनी प्रा. लि., पुणे.
- **चंद्रा :** गवळण कलकत्ते, प्रकाशक - गवळण कलकत्ते, दौंड.
- **कवीच्या गावा जावे :** मंदा खांडगे, प्रतिमा प्रकाशन, पुणे.
- **हवा हवाई :** राम भावे, पुष्प प्रकाशन लि., पुणे.
- **बोल बोलता करोडपती :** राम भावे, पुष्प प्रकाशन लि., पुणे.
- **बहुरूपी वामन :** राम भावे, पुष्प प्रकाशन लि., पुणे.
- **व्यायाम व शरीर क्षमता कशी मोजावी :** के. पी. भागवत

# वाचक-प्रतिसाद सिद्धान्त

❑

डॉ. दिलीप घोंडगे

❑

*'कर्मवीर रामरावजी आहेर कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय', देवळा (नाशिक), येथील मराठी विभागाने आयोजित केलेल्या चर्चासत्रात प्रस्तुत निबंध सादर केला होता, त्याचे हे बरेचसे परिवर्धित स्वरूप आहे.*

युरोप आणि अमेरिकेच्या साहित्यविचार विश्वात १९७०च्या दशकात भाषिककृती विश्लेषण, वि-रचना सिद्धान्त, चिन्हमीमांसा, वाचिक वर्तन सिद्धान्त, ग्रहण सिद्धान्त असे जे विविध सिद्धान्त उदयाला आले, त्यांपैकी वाचक-प्रतिसाद सिद्धान्त हा एक आहे. साहित्यकृती आणि वाचक यांचे परस्परसंबंध व वाचनक्रियेचे स्वरूप यांच्या नव्या दृष्टींतून विचार करण्याच्या पद्धतीमुळे वाचक-प्रतिसाद सिद्धान्त अवतरला आहे.

इ.स. १९४० आणि १९५०च्या दशकातील नवसमीक्षा, संज्ञामीमांसा आणि शैलीमीमांसा या सिद्धान्तांची पार्श्वभूमी वाचक-प्रतिसाद सिद्धान्ताला लाभली आहे. नवसमीक्षेला प्रतिक्रिया म्हणून तर संज्ञामीमांसा आणि शैलीमीमांसा यांतील आवश्यक त्या तत्त्वांचा स्वीकार करून वाचक-प्रतिसाद सिद्धान्त पुढे आला आहे.

नवसमीक्षेच्या तत्त्वांनुसार साहित्यकृतीची संहिता हीच समीक्षेची मुख्य वस्तू! संहितेची संरचना अर्थप्रसवक्षम असते. संहितेचे निकट वाचन करून संहितांतर्गत घटकांच्या परस्परसंबंधांतून जन्मणाऱ्या अर्थाला जाणून घेणे हे वाचकाचे व ह्या आधारे अर्थनिर्णयन करणे हे समीक्षेचे कार्य होय. संहितेच्या ह्या अशा स्वायत्त स्वरूपाला प्रतिक्रिया म्हणून वाचकावर लक्ष केंद्रित करणे गरजेचे आहे, या भूमिकेतून वाचक-प्रतिसाद सिद्धान्त जन्माला आला. ज्ञानमीमांसा, चिन्हमीमांसा, शैलीमीमांसा, संरचनावादी काव्यशास्त्र इत्यादी साहित्यसमीक्षा पद्धतींत संहितेचे संहितामूल्य आणि वाचकाचे साहित्यिक-क्षमतामूल्य यांचा काहीएक विचार झालेला होता. संहितेचे मूल्य संहितार्थात असते आणि संहितार्थ निर्माण करणे, हे वाचकाचे कार्य असते. आपली साहित्यिक-क्षमता व अनुभव यांनुसार वाचक साहित्यकृतीच्या संहितेचे वाचन करून संहितार्थाची निर्मिती करतो, अशी वाचक-प्रतिसाद सिद्धान्ताची भूमिका आहे. वाचकाची भूमिका महत्त्वाची असल्यामुळे वाचकाची विविध प्रतिमाने लक्षात आली. रोमन इनगार्देन यांचा सहसर्जक वाचक, वोल्फगँग इशर यांचा गर्भित वाचक आणि प्रत्यक्ष वाचक, उंबर्तो एकोचा नमुनादर्श वाचक, जोनॅथन कलर यांचा साहित्यिक-सक्षम असा आदर्श वाचक, ही ती काही प्रतिमाने आहेत. आपल्या भारतीय साहित्य शास्त्रातील 'सहृदया'चेही या निमित्ताने स्मरण व्हावे. काव्यगोष्टी, कविसमाज, आणि ब्रह्मसमाज या सर्व ठिकाणी सहृदय असे. काव्यास्वादाची उपपत्ती लावणे, काव्याचा गुणदोषदृष्ट्या विचार

करणे, काव्यावरील आपले मत व्यक्त करणे, ही कामे सहृदय करीत असे. एवढेच नव्हे, तर तो काव्यतत्त्वेही प्रस्थापित करी. असा हा विमल प्रतिभेने युक्त असा सहृदयच काव्यास्वादाचा खरा अधिकारी होय. ''अधिकारी मात्र विमलप्रतिभानशाली सहृदय:'' विमल प्रतिभेने शोभणारा सहृदय हाच रसास्वादाचा अधिकारी आहे, असे अभिनवगुप्त म्हणतो.

आय. ए. रिचर्डस् व विल्यम एम्पसन हे नवसमीक्षा — संप्रदायातले दोन मातब्बर समीक्षक होत. या उभयतांनी वाचकाच्या अर्थनिर्णयनक्षमतेचा मानसिकतेच्या अंगाने विचार केला होता. दुर्बोध संहितेचा अर्थनिर्णय करण्याच्या वाचकांच्या तऱ्हेवाईक पद्धतींनी एम्पसन भारावला होता. जोनॅथन कलरवरही हाच प्रभाव पडून त्याने साहित्यिक क्षमता असलेल्या वाचकाच्या कल्पनेला जन्म दिला. काव्य हे वाचकाच्या मनावर सातत्याने प्रभाव पाडीत असते, हे रिचर्डस्ला वाटत होतेच.

## २.

आता वाचक-प्रतिसाद सिद्धान्ताच्या इतिहासाचा — वाटचालीचा — संक्षेपाने आढावा घेऊ. संज्ञामीमांसक हुसरलपासूनच प्रारंभ करावा लागेल. ज्या वाचक-प्रतिसाद सिद्धान्तावर संज्ञामीमांसेचा प्रभाव आहे, तिचा संस्थापक एडमंड हुसरल (१८५९-१९३८) हा आहे. वाचक-प्रतिसाद आणि ग्रहण सिद्धान्त यांच्याशी संबंधित हुसरलची ज्ञानमीमांसा अशी : आपल्या मनातल्या शुद्ध आशयरूप अगर साररूप बाबींवर लक्ष केंद्रित करून मनातल्याच याव्यतिरिक्त असलेल्या बाह्य बाबींना जर आपण कंसबद्ध केले, तर आपल्याला वास्तवाचे खरेखुरे ज्ञान होते. म्हणून संज्ञामीमांसात्मक समीक्षेत संहिताबाह्य घटकांना कंसबद्ध करून संहितांतर्गत घटकांचे वाचन करून लेखकाच्या शुद्ध संज्ञा-आविष्काराप्रत पोचणे या प्रक्रियेला महत्त्व असते. जग आणि लेखकाचे मन यांच्या संज्ञामय संबंधांचा आविष्कार संहितेत होतो. हा आविष्कार भाषेतून अगदी सरळपणे होतो. ह्या आविष्काराला जाणून घेण्यासाठी वाचक हा वस्तुनिष्ठ आणि ग्रहणशील पाहिजे. हुसरलच्या या संज्ञामीमांसेवर ग्रहणसिद्धान्त आधारित आहे. हीच मीमांसा जिनिव्हा स्कूलच्या समीक्षकांनी आधाराला घेतली. जॉर्जस् पुलट हा जिनिव्हा स्कूलचा एक महत्त्वाचा समीक्षक आहे; त्याच्या विचारांचा परिचय पुढे येईलच.

व्होल्फगँग इशर हा एक महत्त्वाचा ग्रहणवादी सैद्धान्तिक. याने रूपवाद, चिन्हमीमांसा, संज्ञामीमांसा यांतील संकल्पना स्वीकारल्या. हुसरलचा शिष्य रोमन इनगार्देन याच्या दृष्टिकोनाने तो प्रभावित झालेला होता. संहिता ही शब्दापासून आकारापर्यंत अनेकस्तरीय रचना असते, हे The Literary Work of Art (1931) या रोमन इनगार्देनच्या ग्रंथाने स्पष्ट केले होते. कलाकृतीच्या कल्पनीय घटकांत अनिश्चित जागा असतात. वाचक आपल्या क्षमतेने त्या अनिश्चित जागा निश्चित अशा घटकांची निर्मिती करून भरून काढतो. परिणामत: आकाराची उभारणी होते. इशरने या आधारावरच आपला विचारव्यूह उभा केला आहे. इशरने प्रत्यक्ष वाचक आणि गर्भित वाचक अशा वाचकाच्या दोन संकल्पना निर्माण केल्या आहेत. प्रत्यक्ष वाचक हा अनुभवाच्या संचितांना प्रतिमारूप देतो. संहितेची संरचना गर्भित वाचकाला जन्माला घालते व त्याला योग्य निर्णयाप्रत

जाण्यासाठी भाग पाडते; अशा इशरनिर्मित या दोन संकल्पनांचा इत्यर्थ आहे. इशरच्या सिद्धान्तातली तीन सूत्रे अशी :

१. साहित्यकृतीत अनिश्चिततेच्या जागा असतात;

२. वाचक त्या आपल्या सर्जक प्रतिसादाने निश्चित करतो आणि

३. साहित्यकृती आणि वाचक हे एका विशिष्ट सांस्कृतिक परिवेशात वावरत असतात.

इशर यांच्या या सूत्रांचे प्रत्यक्षीकरण काही साहित्यकृतींची उदाहरणे घेऊन निबंधाच्या तिसऱ्या भागात केलेले आहे.

जिनिव्हा संप्रदायी जॉर्जस् पुलट याची भूमिका सारांशरूपाने अशी : तो म्हणतो : मला जेव्हा वाचणे भाग असते आणि वाचकापाशी जी समग्र बांधिलकी हवी - त्या बांधिलकीने मी वाचतो, तेव्हा माझे आकलन हे अंत:प्रेरित असते. वाचकसापेक्षता पुलट महत्त्वाची मानतो.

हॅन्स रॉबर्ट झॉस हाही संज्ञामीमांसावादी परंपरेतील तत्त्वज्ञ. याच्या मते, वाचकांच्या क्रमश: अनेक पिढ्यांच्या सामूहिक अर्थविश्लेषणाने साहित्यकृतीचे स्वरूप निश्चित होते. प्रत्येक वाचक हा साहित्यकृतीचे वाचन विशिष्ट आकांक्षा-क्षितिजांच्या भिंगातून करीत असतो. ही आकांक्षांची क्षितिजे म्हणजे वाङ्मयीन संकेत किंवा नियम असतात. साहित्यकृती ज्या क्षितिजाच्या भिंगातून वाचली जाईल, त्या क्षितिजामुळे म्हणजे संबंधित साहित्यविषयक संकेतांनी तिचे अस्तित्व निश्चित होईल.

हॅन्स जॉर्ज गदमर याच्या विचारांचा झॉसवर प्रभाव होता. गदमरचा सौंदर्य-सिद्धान्त हिडिगरच्या तत्त्वकल्पनांवर आधारित होता. मानवी अस्तित्वाच्या प्रदत्ततेवर हिडिगरने भर दिला. ऐतिहासिकतेला आपण मानवी स्थितीतून सोडवू शकत नाही. गदमरच्या मते वाचन हा भूत आणि वर्तमान यांना जोडणारा एक प्रयत्न असतो. वर्तमानकालीन वाचनक्रियेत आपण संस्कृतीच्या पूर्वसंकल्पना टाळू शकत नाही; पण जुन्या संहितेला नव्या आकलनाचा प्रकाश देऊ शकतो, परंपरा आणि नवता यांचा संगम घडवून आणू शकतो. गदमरचा सिद्धान्त स्वीकारून संहिता, लेखक, वाङ्मयीन प्रभाव यांच्यावर प्रकाश न टाकता संहितेला भूतकाळापासून ते आजतागायतच्या स्वरूपापर्यंत ग्रहण करण्याचा सिद्धान्त झॉसने विकसित केला.

पॉल रिकर हा महत्त्वाचा अर्थनिर्णयनवादी समीक्षक आहे. हिडिगर, फ्रॉईड आणि मार्क्स यांच्या मर्मदृष्टींची सूक्ष्म गुंफण म्हणजे रिकरचे लेखन, असे मानले जाते. दुसऱ्याची संहिता वाचत असताना वाचकाला स्वत:चे आकलन होते, हा अस्तिपक्षी लाभ गदमर आणि झॉस यांच्यासारखाच पॉल रिकरला महत्त्वाचा वाटतो.

हुसरलच्या मतांनी प्रभावित झालेला इ.डी. हिर्श हा एक साहित्यमीमांसक आहे. हुसरलप्रणीत संज्ञामीमांसेत वास्तवाचे ज्ञान हे वस्तूंऐवजी मनाच्या संरचनेत होते. या दृष्टीने विचार करता संहितेचा अर्थ हा लेखकाच्या मानसिक वस्तूशी संबंधित असतो. निर्मितीच्या वेळेचा मानसिक हेतू त्यात असतो; म्हणून अर्थ हा हेतुनिष्ठ वस्तू असतो; भौतिकनिष्ठ वस्तू नसतो. हुसरलच्या याच युक्तिवादांचा हिर्शने आधार घेतला आहे. हिर्शने 'अर्थ' आणि 'अभिप्राय' अशा दोन संकल्पना मांडल्या आहेत. कलाकृतीच्या किंवा साहित्यकृतीच्या संदर्भातल्या या दोन संकल्पनांमुळे

साहित्यकृतीच्या बव्हर्थकतेचा जुनाट प्रश्न त्याने सोडवला आहे. अर्थ हा निश्चित किंवा स्थिर असून तो लेखकाच्या हेतूशी संबद्ध असतो; तर अभिप्राय हा संबंधित कृतीच्या काळाने नियंत्रित केलेल्या विश्लेषणाशी म्हणजे वाचकाशी संबद्ध असतो. परिणामत: अभिप्राय हे अस्थिर असतात. मूळ अर्थाशी संबंधित वेगवेगळे अभिप्राय व्यक्त होतात. लेखकाच्या हेत्वार्थाची व रसिकाच्या अभिप्रायाची गाठ पडायला हवी, अशी तो अपेक्षा ठेवतो. पण असे झाल्याचे कधी दिसत नाही.

नॉर्मन हॉलंड व डेव्हिड ब्लिश हे अमेरिकन साहित्यविमर्शक मानसशास्त्र हा त्यांच्या विचारांचा प्रस्थानबिंदू ठेवतात. साहित्यकृती ही प्रतिकीकरणासाठी गृहीत धरून - तसे जाणूनही -अखेरीस आपण आपल्या प्रतिरूपणासाठी वापरत असतो, असा हॉलंडचा अभिप्राय आहे. संहितेला वाचकाने दिलेला उत्स्फूर्त प्रतिसाद आणि नंतर त्याचेच अर्थाचे वस्तुनिष्ठ विवेचन यात ब्लिश भेद करतो. नंतरचे वस्तुनिष्ठ विवेचन किंवा अर्थनिर्णयन पहिल्या अवस्थेतील उत्स्फूर्त प्रतिसादावरच अवलंबून असते.

जोनॅथन कलर याने साहित्यिक क्षमता असलेल्या वाचकाचा विचार केला आहे. साहित्यकृतीच्या संहितेत वाचकाचे ध्यानाकर्षण करणारे Strangeners, a power, an organisation, a permanence हे घटक असतात. हे घटक सामान्य संप्रेषणापेक्षा निराळे असतात. ज्या वाचकापाशी साहित्यिक क्षमता असते, तो या घटकांचे नेटके वाचन करून साहित्यकृतीला अर्थसंक्रामक करतो.

स्टॅनलि फिश याने 'वाचकवर्गाची' संकल्पना मांडली आहे. साहित्यकृतीच्या अर्थाची निश्चिती हा वाचकवर्ग करीत असतो. अर्थनिर्णयनासाठी लागणारी व्यूहरचनाच ही वाचनप्रक्रिया घडवून आणत असते. ही व्यूहरचना वाचकवर्गाची असते; किंबहुना या वाचकवर्गाचे व्यूहरचनेवर अधिपत्य असते. स्त्रीवादी समीक्षा ही एका विशिष्ट वाचकवर्गाची समीक्षा म्हणता येईल. स्त्रीसत्ताक वाचनपद्धती असावी, म्हणून तशी व्यूहरचनात्मक साधनेही या पद्धतीने विकसित केली आहेत.

वरील विविध मीमांसकांच्या सिद्धान्तांमुळे संहिता व वाचक यांची स्वायत्त क्षेत्रे परस्परांत मिळून-मिसळून संहितार्थाची उभारणी करू लागली. वाचकाच्या सर्जक सहभागामुळे वाचकालाही सर्जनशक्तीचा प्रत्यय येऊ लागला. वाचन हीच संहितानिर्मिती (Reading as textuality) ह्या उत्तर संरचनावाद्यांच्या विचाराकडे वाचक-प्रतिसाद-सिद्धान्ताने वाटचाल केलेली दिसते. अनेक सिद्धान्तांच्या विविध मर्मदृष्टींचा स्वीकार केल्यामुळे वाचक-प्रतिसाद-सिद्धान्ताला ही मजल गाठता आली. अर्थात विविध मीमांसकांच्या सिद्धान्तांच्या आधारे वाचक-प्रतिसाद-सिद्धान्त उभा करावा लागतो; त्याची स्वत:ची सलग सिद्धान्तप्रणाली नसल्याचा हा परिपाक आहे. आता सिद्धान्तांकडून उपयोजनाकडे जाणे आवश्यक आहे. त्यासाठी विशिष्ट प्रारूपे सिद्ध करायचे काम संबंधित सिद्धान्ताच्या अभ्यासकांना करावे लागणार आहे.

३.

प्रस्तुत निबंधाच्या दुसऱ्या भागात वोल्फगँग इशरच्या तीन सूत्रांची नोंद केली आहे. या सूत्रांचे प्रत्यक्षीकरण काही साहित्यकृतींची उदाहरणे घेऊन करू.

पहिले उदाहरण : संत तुकारामांची अभंगांतर्गत असलेली ही एक पशुपक्षी कथा. कथेची संहिता अशी[१] :

*सुख वाटे तुझे वर्णिता पवाडे। प्रेम मिठी पडे वदनासी॥*
*व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी। आला दुराचारी पारधी तो॥*
*वृक्षाचिया माथा सोडिला ससाना। धनुष्यासि बाणा लावियेले॥*
*तये काळी तुज पक्षी आठविती। धावे गा श्रीपती मायबापा॥*
*उडोनिया जाता ससाना मारील। बैसता विंधील पारधी तो।*
*ऐकोनिया धावा तया पक्षियांचा। धरिला सर्पाचा वेश वेगी॥*
*डंखोनि पारधी भूमीसि पाडिला। बाण तो लागला ससान्यासी॥*
*ऐसा तूं कृपाळु आपुलिया दासा। होसील कोंवसा संकटींचा॥*
*तुका म्हणे तुझी कीर्ति त्रिभुवना। वेदाचिये वाणी वर्णवेना॥*

(अभंग क्रमांक : ६०७)

या कथेत स्थळाचे वर्णन तर सोडाच; पण उल्लेखही नाही. पद्याचा अवकाश लहान असल्यामुळे भौतिक सृष्टी चितारणाऱ्या अवकाशाला स्थान मिळणे अशक्य होते; पण काही सूचक चिन्हांमुळे वाचकाकडून निश्चित अवकाशाची निर्मिती होऊ शकते. पारधी, वृक्ष, पक्षी, ससाणा, धनुष्य व बाण, सर्प या ठळक चिन्हांमुळे (signs) या कथेत अनिश्चित (indeterminate) असलेला वनाचा अवकाश सर्जक वाचकाच्या मनात निर्माण होतो. लेखकाने (कवीने) उभी केलेली एकजिनसी चिन्हसमष्टी व वाचकाचा कल्पित कृतियुक्त सहभाग यांचे सहसर्जन होऊन हा अवकाश उभा राहिला.[२] विशिष्ट स्थलकालाशी निबद्ध नसलेले वातावरण उघडच काल्पनिक असते; पण स्थलकालबद्ध वातावरणही काल्पनिक असते. लेखक हा लौकिकार्थाने त्या घटनांचा साक्षीभोक्ता नसतो. कल्पनेने केलेली ती वातावरणनिर्मिती असते. वाचकही कथासंहिता व आपापले संकेतज्ञान यांच्या साह्याने हा स्वविशिष्ट अवकाश निर्माण करीत असतो. त्याचा हा कल्पक सहभाग त्याला आनंददायक वाटत असतो.

या कथेचे घटनादृष्ट्या वाचन केले, तर खालील घटनाक्रम लक्षात येतो.

०. निवेदकाला या घटना कथन करताना आनंद वाटतो.
१. एका वृक्षावर दोन पक्षी व्याले होते.
२. तेथे दुराचारी पारधी आला.
३. त्याने वृक्षाच्या माथ्याच्या दिशेने ससाणा सोडला; नंतर (धनुष्य हातात घेतले, भात्यातून बाण काढला.)
४. धनुष्याला बाण लावला.
५. पक्ष्यांनी मायबापा श्रीपती, धाव व रक्षण कर, असा तुझा धावा सुरू केला.
६. उडून गेलो तर ससाणा मारील व बसून राहिलो तर पारधी विंधील. (तेव्हा तूच रक्षण कर.)
७. पक्ष्यांचा धावा ऐकून परमेश्वराने सर्पाचा वेष धारण केला. नंतर
८. पारध्याला सर्पाने डंख मारला व त्यामुळे पारधी भूमीवर मरून पडला. (मात्र त्याने जोडलेला

बाण त्याच्या हातून सुटला) व

९. ससाण्याला लागला आणि

१०.ससाणा मेला.

कंसस्थ घटना या वाचतावाचता वाचकाने भरून काढलेल्या घटना आहेत; त्यांना गौण घटना म्हणतात व कंस नसलेल्या घटना या कथासंहितेत आलेल्या घटना आहेत; त्यांना प्रमुख घटना म्हणतात. रोलां वार्त प्रमुख घटनांना nuclei व गौण घटनांना catalysers असे म्हणतो. वरील कथेत गौण घटनांचे प्रमाण कमी आहे. अभंग या छंदाच्या मर्यादित परिघात गौण घटनांपेक्षा प्रधान घटनांनाच अधिक स्थान मिळणे स्वाभाविक आहे. एखादी प्रधान घटना अनेक गौण घटनांच्या क्रमबद्धतेनेही सिद्ध होत असते. गद्यात ही क्रमबद्धता नोंदवून निवेदन लयबद्ध करता येते.

आता या कथेतील घटनांच्या परस्परसंबंधाचा विचार करू. घटना क्र. ० हेतू निवेदित करते. घटना क्र. २, ३ व ४ आणि घटना क्र. ८, ९ व १० यांत विरोध आहे. दुसऱ्याचा जीव घेण्यासाठी सज्ज होणे व स्वत:चाच जीव गमावून बसणे, यांत विरोधनिष्ठ संबंध आहे. घटना क्र. ५, ६ व घटना क्र. ७, ८, ९ व १० यांत कार्यकारणसंबंध आहे. म्हणून इथे सामीप्यमूल संबंधामुळे सममूल्यता येते. घटना क्र. ५ व ६ या कारणरूप घटनांमुळे घटना क्र. २, ३ व ४ आणि घटना क्र. ८, ९ व १० या घटनांमधील विरोधनिष्ठ संबंध दृढ होऊन घटना क्र. ७, ८, ९ व १० यांतले कार्य घडून येते. यावरून असे दिसते की, घटना क्र. ०, ५, ६, ७, ८, ९ व १० ह्या एकाच आशयाचे पोषण करणाऱ्या घटना आहेत; व ह्या सात घटनांच्या विरोधी घटना क्र. २, ३ व ४ ह्या तीन घटना आहेत. घटना क्र. २, ३ व ४ ह्या घटना प्रत्यक्षात घडूनही त्यांच्याद्वारा इप्सित साध्य झाले नसले, तरी त्यांनी एक ताण-पेच निर्माण केला आहे. हा पेच घटना क्र. ७ ह्या अद्‌भुत घटनेने सुटतो. घटना क्र. ०, १, २, ३, ४, ८, ९ व १० ह्या वास्तव घटना व घटना क्र. ७ ही अद्‌भुत घटना यांत विरोध निर्माण होतो व तो सौंदर्योत्पादक ठरतो. घटना क्र. ५, ६ व ७ ह्या वास्तवविरोधी घटना वास्तवरूप धारण करून अंगभूत विरोधाने एक सौंदर्यपूर्ण कथात्मता निर्माण करतात, याचा प्रत्यय वाचकाला येतो.

याच पद्धतीने या कथेतील पात्रांचा परस्परसंबंधही पाहता येईल.

पक्षी, पारधी, ससाणा व सर्पवेषधारी परमेश्वर अशी चार पात्रे या कथेत आहेत. विभिन्न कोटीतली ही चारही पात्रे तशी प्रमुख पात्रे आहेत. पक्षी व पारधी यांच्यातील संबंध हा विरोधी आहे. पारध्याला पक्ष्याची पारध करून ठार मारायचे आहे. शत्रुत्व हा त्यांच्यातला संबंध आहे. ससाणा व पक्षी यांच्यात शत्रुत्वाचा संबंध निर्माण केला गेला आहे. पारधी व सर्पवेषधारी परमेश्वर यांच्यातील संबंध विरोधीच आहे, पण पारधी व पक्षी यांच्यातील संबंधातून पारध्याचा 'दुराचार' दिसतो. तुकोबांनी 'दुराचारी' हे विशेषण वापरले आहेच. ह्या दुराचारातून पारध्याचे खलत्व दिसते. परमेश्वर व पारधी यांच्या विरोधी संबंधातून परमेश्वर भक्ताचा आधार घेऊन कंटकाचे-भक्ताचे-पारध्याचे-निर्दालन करतो. यामुळे पक्ष्यावर दया येऊन पक्ष्याचे पालन होते. ससाणा व पारधी यांच्यात एकवाक्यता व कृतीचा एकोद्देश आहे; परिणामत: त्यांच्यातील संबंध साधर्म्ययुक्त आहे. पण मरतानाच पारध्याच्या हातून जो बाण सुटतो, त्याने ससाणा मरतो. ह्या पातळीवर ससाणा व पारधी यांच्यात विरोध प्रस्थापित होतो. हा नाट्यपूर्ण विरोध सौंदर्योत्पादक आहे.

इशरच्या सूत्रांबरोबर इतर मीमांसकांच्या तत्त्वांचा वापरही या वाचनात होत आहे, हे घ्यानात घ्यावे.

दुसरे उदाहरण [४] :

*देखोनि पुराणिकांची दाढी। रडे फुंदे नाक ओढी॥*
*प्रेम खरे दिसे जना। भिन्न अंतरी भावना॥*
*आवरितां नावरे। खुर आठवी नेवरे॥*
*बोलो नये मुखावाटां। म्हणे होता ब्यांचा तोटा॥*
*दोन्ही सिंगे चारी पाय। खुणा दावी म्हणे होय॥*
*मना आणिता बोकड। मेला त्याची चरफड॥*
*होता भाव पोटीं। मुखा आलासे शेवटी॥*
*तुका म्हणे कुडें। कळो येते ते रोकडें॥*

(अभंग क्र. ११६)

याही अभंगांतर्गत कथेत विशिष्ट स्थलप्रदेशाचे वर्णन नाही; पण कथेतील चिन्हसृष्टी व चेतक यांमुळे वाचक अवकाश उभारतो. पुराणिक ह्या चिन्हाचा सामान्य नामात्मक उल्लेख आहे; तर पुराणिकाची दाढी पाहून रडणारा, फुंदणारा, नाक ओढणारा कुणीतरी असावा, असा बोध त्याच्या क्रियासूचक रूपांवरून होतो; तो श्रोता असावा असे अनुमान करता येते. पुराणिकबोवा बोटांनी खुणा करतात व श्रोता होय होय म्हणून प्रतिसाद देतो. या घटना व्यंग्यार्थक आहेत. पात्रापात्रांतील परस्परसंबंध व चेतक यांच्या साह्याने एक संहिता तयार करता येऊ शकते. या संहितेच्या आधाराने विविध सौंदर्यवस्तू निर्माण होतात. अर्थात अशा ठिकाणी मूळ अभिप्रेत आशयाचा छडा लागतोच असे नाही.[५]

ह्या कथेतील पुराणिक देवळात पुराण सांगत असणार. त्याच्या विवेचनात अर्थातच आध्यात्मिक विषय असणार. पुराणिकबोवा आपल्या विषयप्रतिपादनाच्या वाचिक माध्यमाला हावभावांची जोड देतो. श्रोते ऐकत आहेत; पैकी एक श्रोता फारच समरस झालेला दिसतो. पुराणिकबोवा जेव्हा 'दोन, चार' ह्या संख्यावाचक विशेषणांना पूरक म्हणून बोटांच्या खुणा करून जोड देतात, तेव्हा हा एक श्रोता 'होय, तेच' असे म्हणून तत्काल प्रतिसाद देतो. म्हणजे पुराणिकबोवा व तो एक श्रोता यांच्यात संदेशन घडते आहे, असे दिसते; पण 'श्रोत्याच्या अंतरीची भावना' भिन्न आहे. पुराणिकबोवा निरूपण करत आहेत एका गोष्टीचे व श्रोता अर्थ लावतो आहे भिन्न गोष्टीचा. म्हणजे इथे खऱ्या अर्थाने संदेशन घडत नाही आहे. तरी पण वाच्यार्थाने जे संज्ञापन घडते आहे, ते कशामुळे असा प्रश्न उपस्थित होतो. पुराणिकबोवाची दाढी, दोन बोटे दाखविणे, चार बोटे खुणेने दाखविणे ही संज्ञापन घडवून आणणारी चिन्हसृष्टी आहे. दोन बोटांच्या खुणांमुळे श्रोत्याला बोकडाची दोन शिंगे आठवतात. चार बोटांच्या खुणांमुळे बोकडाचे चार पाय आठवतात. पुराणिकबोवांची दाढी पाहून बोकडाची दाढी आठवते. पण हे अर्थ श्रोत्याच्या बाजूचे झाले. आता दोन व चार ह्या संख्याविशेषणांमुळे पुराणिकबोवांच्या मनात कोणते अर्थ अभिप्रेत असतील, हा प्रश्न पडतो. पुराणिकबोवांचे निरूपण हे आध्यत्मिक विषयावरचे असले तरी दोन व चार ह्या खुणांचे



अनुक्रमणिका

अर्थ कळणे कठीण होते. श्रोत्याला पुराण श्रवण करताना आपला मृत बोकड आठवतो. तो बियाण्याचा असल्यामुळे त्याच्या मरणाने श्रोत्याचे फारच नुकसान झाले आहे. पुराणिकबोवांची दाढी पाहताक्षणापासूनच आपला मृत बोकड आठवतो व नंतर पुराणिकबोवाचे पुढील विवेचन हे बोकडाच्या वर्णनाशी, त्याच्या अस्तित्वात नसण्याशी सुसंगत होते. पण प्रश्न येतो तो पुराणिकबोवाच्या मनातील अर्थाचा! संहितेतले असे तुटक दुवे (segments) लक्षात घेऊन संहितेतल्या रिकाम्या जागा भरून काढण्याचा प्रयत्न होतो. अशा निर्मितीला सौंदर्यवस्तू म्हणतात. विविध अभ्यासकांनी प्रस्तुत कथेतील तुटक दुवे जोडण्याचा व रिकाम्या जागा भरण्याच्या कसा प्रयत्न केला आहे; ते पाहू.

१. "...फक्त ब्यां तेवढे नाही; बाकी सगळे आहे. पुराणिकाने लाक्षणिक अर्थ घेऊन; ब्या नाहीत म्हणजे विया नाहीत, बीजे नाहीत, ब्रह्म व आत्मा यांचे ज्ञान नाही असे वाटून खुणा केल्या. दोन का? चार का? श्रोता होय म्हणाला. कारण त्याच्या मनात दोन शिंगे आणि चार पाय आठवले."[६]

२. "... तो म्हणे, आतां मुखानें काय बोलावें? ह्या हजारो शेरड्यांमध्ये माझा बोकड ब्याचा म्हणजे बेण्याचा असा एकुलता एक होता. पुराणिकबोवा पुराण सांगताना एक पुरुष व दुसरी प्रकृति असे दोन बोटे करून श्रोत्यांना सांगत. पुराणिकबोवांनी दोन बोटे पुढे केलेली पाहून तो धनगर श्रोता म्हणे, 'होय हो, माझ्या बोकडाला दोनच शिंगे होती. तुम्ही बरोबर त्याच्या खुणा दाखवितां, पुराणिकबोवा!' हे ईशाचे देह चार आहेत असे चार बोटे पुढे करू लागले ते पाहून तो धनगर श्रोता म्हणे, 'होय हो, त्याला चारच पाय होते. तुम्ही त्याच्या बरोबर खुणा दाखविता?"[७]

३. "तो म्हणू लागला, काय सांगू हो? हा माझा बोकड वियाण्याचा म्हणून राखलेला होता, तोच गेला हो. पुराणिकांनी एका बीजाचा हा विस्तार कसा हे सांगितले, तेव्हा त्यास आपल्या 'ब्याच्या' बोकडाची आठवण झाली. पुराणिकबोवा सांगत होते, एक पुरुष एक प्रकृती, चार वेद किंवा ईश्वराची चार रूपे. तो धनगर दोन व चार बोटांचा अर्थ मनाशी समजत होता, हो हो माझ्या बोकडास दोन शिंगे होती, चार पाय होते."[८]

कथावस्तू किंवा कलावस्तूच्या आधाराने निर्माण झालेल्या ह्या सौंदर्यवस्तू म्हणता येतील. कथासंहितेत पुराणिकबोवा व श्रोता यांच्यात कृतक संवाद घडतो, खरा संवाद घडत नाही, घडूही शकत नाही. पुराणिकबोवाची दाढी पाहून धनगराला आपला मेलेला बोकड आठवतो. रडू येते, तो स्फुंदू लागतो, त्याला रडू आवरत नाही. बोकडाचे पांढरे खूर त्याला दिसू लागतात. पुराणिकाच्या निरूपणातून एका श्रोत्याच्या मनात बोकड समूर्त होऊ लागतो. हे विसंज्ञापन हा कथेचा खरा गाभा आहे; व यातच सारा विनोद दडलेला आहे. आपल्या एकुलत्या एक बेण्याच्या बोकडामुळे श्रोता रडतो. त्याचे सर्वस्व म्हणजे बोकड. लौकिकासाठी रडणारा श्रोता व अलौकिकाचे स्पष्टीकरण करणारा पुराणिक हा मूलभूत विरोध आहे. अंतर्यामी लौकिकाचा जय करायचा व वरवर प्रभूनाम घ्यायचे, देवळात जाऊन पुराणिकाचे पुराण ऐकायचे, हे विसंगत वर्णन आहे. म्हणून तुकोबा भाष्यात म्हणतात की, अंत:करणातली खोटी भावना ही केव्हातरी प्रकट होतेच. अंत:करणातला

भाव मुखावाटे खरेपणाने बाहेर येतोच. एरव्ही, इतर श्रोत्यांच्या दृष्टीने सहृदय असणारा हा श्रोता 'मावेचा मैंद' आहे, हे स्पष्ट होते. तुकोबांनी या कथेसाठी लोककथेचा घाट वापरलेला आहे. विविध काळात विभिन्न आशय धारण करून असे आकृतिबंध प्रकट होत असतात.

तिसरे उदाहरण[९]:

*परिसें गे सुनेबाई। नको वेचूं दूध दहीं॥*
*आवा चालली पंढरपुरा। वेसीपासुनि आली घरा।*
*ऐकें गोष्टी सादर बाळे। करी जतन फुटके पाळें॥*
*माझे हातींचा कलवडू। मजवांचुनि नको फोडूं॥*
*वळवटक्षिरीचे लिंपन। नको फोडूं मजवांचून॥*
*उखळ मुसळ जातें। माझें मन गुंतले तेथें॥*
*भिक्षुक आल्या घरा। सांग गेली पंढरपुरा॥*
*भक्षी परिमित आहारु। नको फारसी वरो सारुं॥*
*सून म्हणे बहुत निकें। तुम्ही यात्रेसि जावे सुखें॥*
*सासूबाई स्वहित सोडा। सर्व मागील आशा सोडा॥*
*सुनमुखीचे वचन कानीं। ऐकोनि सासू विवंची मनीं॥*
*सवतीचे चाळे खोटे। म्यां जावेसें इला वाटे॥*
*आता कासया यात्रे जाऊं। काच जाऊनि तेथें पाहूं॥*
*मुले लेंकरें घर दार। माझें येथेंचि पंढरपूर॥*
*तुका म्हणे ऐसें जन। गोवियेलें मायेंकरून॥*

(अभंग क्र. ४२१९)

तुकोबांचीच अभंगातंर्गत ही तिसरी कथा. ही व्यक्तिचित्रणात्मक कथा आहे. ह्या कथेत विशिष्ट स्थलप्रदेशाचे वर्णन नाही. या कथेत येणाऱ्या चेतकांमुळे अवकाश-निर्मिती होते. एक गाव, त्यातली घरे, त्या घरांपैकी एक घर, गावाची वेस इत्यादी भौतिक गोष्टींचे चित्रण वाचकांच्या मन:पटलावर आपापल्या संकेतज्ञानानुसार होते.

आवा - पंढरपूरला यात्रेला निघाली. वेशीपर्यंत गेली आणि तेथून परत आली. फुटके पाळे, वळवटक्षिरीचे लिंपन, उखळ, मुसळ, जाते, अन्नधान्य ही संसारप्रपंचाचे निदर्शन करणारी चिन्हसृष्टी आहे. ह्या कथेत दोनच पात्रे आहेत. एक सासू व दुसरे सून. सामाजिक संरचनेत ह्या पात्रांना विशिष्ट भेदमूलक सांकल्पनिक अर्थ आहेत. भारतीय समाजरचनेत सासूचे स्थान वरिष्ठ तर सुनेचे स्थान कनिष्ठ आहे. परिणामत: त्यांच्यात वैरभाव असणे, ही स्वाभाविक स्थिती झाली आहे. वेशीपासून घरी परत आलेली सासू एकामागून एक सूचना देते. त्या सूचनांवरून तिचे प्रपंचात गुंतलेले मन तर कळतेच; पण सुनेवरचा तिचा अविश्वासही कळतो. सासूच्या तोंडचे बोलणे 'परिसे गें सुनेबाई...' ह्या वाक्याने सुरू होते. कथेच्या सुरुवातीचेच हे विधान सासूबाईच्या अधीरतेवर प्रकाश टाकते. वेशीपासून परत आलेली सासू पहिल्याच वाक्यात ''परिसें गें सुनेबाई'' या चरणानंतर ''नको वेचूं दूधदहीं'' असे म्हणते. ''परिसें गे सुनेबाई'' या चरणावरून ती सुनेला जवळ

येऊन सूचना देण्याऐवजी लांबूनच मोठ्याने सांगत असावी, असे वाटते. नंतर मग जवळ येऊन 'ऐके गोष्टी सादर बाळे... फुटके पाळे जतन कर, कलवडू फोडू नको, वळवटक्षिरीचे लिंपन फोडू नको, उखळ-मुसळ-जाते ह्यांत माझे मन गुंतले आहे. भिक्षुक घरी आल्यानंतर त्याला सासूबाई पंढरपुरास गेल्याचे सांग. तू स्वत: मोजकेच खा. फारसा खर्च करू नको इत्यादी सूचना करते. ही सर्व आज्ञार्थी वाक्ये 'सासू' ह्या पात्राच्या भूमिकचा उत्तम परिपोष करतात. एकामागून एक सूचना करणारी ही सर्व गतिशील वाक्ये आहेत. ही सर्व आज्ञार्थी वाक्ये नकारार्थी आहेत. ती नकारात्मक कृती करायला लावणारी आहेत. 'भिक्षुक आल्या घरा। सांग गेली पंढरपुरा' ह्या वाक्यात फारच नाट्य भरले आहे.' ''सून म्हणे बहुत निकें। तुम्ही यात्रेंसि जावें सुखें।'' हे आदरपूर्वक विनंतीसूचक विध्यर्थी वाक्य तर ''सासूबाई स्वहित जोडा। सर्व मागील आशा सोडा'' हे सल्लासूचक आज्ञार्थी वाक्य आहे. या वाक्यात गर्भित उपहास आहे. इतकेच नव्हे तर ''सर्व मागील आशा सोडा'' या वाक्यात तर उघडपणे स्पष्ट सल्ला दिला आहे. यामुळे सासू चरफडते, विचारात पडते. ''आता कासया यात्रे जाऊ ? काय जाऊनि तेथे पाहू ?'' सासूबाईंचे चरफडणे हे वरील प्रश्नोक्तींवरून लक्षात येते. ''सवतीचे चाळे खोटे। म्यां जावेसे इला वाटे'' असा सुनेवर ती एक प्रकारे आळ घेते. 'सवत' असा शत्रू ह्या अभिप्रेत अर्थाचा शब्दप्रयोग करून आपली चरफड ती व्यक्त करते. सुनेचे बोलणे हे निमित्ताला कारण ठरते व सासूचा लोभीपणा, दांभिकपणा झाकण्याची तिला अनायासे संधी मिळते.

सबंध कथा वाचून झाल्यावर ''आवा चालली पंढरपुरा। वेसीपासूनि आली घरा॥'' यातील उपरोध खूपच ठसतो. ह्या सबंध कथेत घटना, व्यक्ती, मूल्य ह्यांतील विरोध खूप सूक्ष्म पातळीवर प्रकट होतो. मूल्यदृष्ट्या ह्या विरोधाला फारसा अर्थ वाटत नसल्यामुळे त्यातून उपरोध उपहासाची निर्मिती होऊन हास्य निर्माण होते. सासूबाई ही त्यामुळे 'आवा' होते. तुकोबांनी सासूबाईंचे एकूण वर्तन लक्षात घेऊन त्याचा प्रयोग केला आहे. कुत्सार्थी वापरला जाणारा हा शब्दप्रयोग त्यामुळे खूपच परिणामकारक ठरतो.

''तुका म्हणे ऐसे जन। गोवियेलें मायेकरून॥'' हे तुकोबांचे भाष्य आहे. तुकोबा म्हणतात, अशी ही मंडळी मायेच्या पसाऱ्यात अडकली आहे; त्यामुळे त्यांना परमार्थाचे भान नाही. परमार्थासाठी पाऊल उचलवत नाही; कसे तरी उचलले गेले तरी पुढे टाकवत नाही. याला कारण माया. संसारप्रपंच, धनवित्तगोत हा मायेचा पसारा. या मायेत गोवली गेलेली मंडळी धैर्याने परमार्थ करू शकत नाही. आपल्या समाधानासाठी आपले घरदार यांनाच परमेश्वर आणि तीर्थक्षेत्र मानण्याबद्दल त्यांची मजल आहे.

अशा प्रकारे वरील तीन उदाहरणांचे वाचन करता येऊ शकते. इशरची तीन सूत्रे व इतर मीमांसकांची तत्त्वे यांच्या प्रकाशात हे वाचन केले आहे. प्रस्तुत निबंधाच्या दुसऱ्या भागात जो ऐतिहासिक परिप्रेक्ष्य मांडला आहे, त्याचे स्पष्टीकरण व्हावे, यासाठी तिसऱ्या भागात हे उपयोजन — प्रत्यक्षीकरण — केले आहे.

संदर्भ व टीपा :

१. 'श्री तुकारामबाबांच्या अभंगांची गाथा', १९७३, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.

२. ... Thus, the author and reader are to share the game of Imagination and indeed, the game will not work if the text sets out to be anything more than a set of governing rules. The reader's enjoyment begins when he himself becames productive i.e. When the text allows him to bring his own faculties into play..." Wolfgang Iser," The Act of Reading', 1978, Baltimore, Johns Hopkins University.

3. Roland Barthes, "Image-Music-Text (Trams.) Stephen Heath, 1977, Flamingo, P-93

४. 'श्री तुकारामबाबांच्या अभंगांची गाथा', उनि.

५. To sum up, then, we have observed that the wandering view point permits the reader to travel through the text, thus unfolding the multiplicity of interconnecting prescriptives which are offset whenever there is a switch from one to another. This gives rise to network of possible connections which are characterised by the fact that they do not join to gather isolated data from the different perspectives, but actually establish a relationship of reciprocal observations between stimulant and stimulated perspectivies. This network of connectins potentially encompass the whole text, but the potential can never be fully realised, instead of forms the basis for the many selections which have to be made during the reading process and which though intersubjectively not identical - as is shown by the many different interpretations of a single text - nevertheless remains intersubjectively comprehensible in so far as they are all attempts to optimize the same structure, op.cit., 1978, p. 118.

६. वा ब. पटवर्धन व ग. ह. केळकर (संपा.) ''श्री तुकारामाच्या अभंगाची चर्चा'' खंड १ ला, अभंग १-३५०, १९२७, पुणे, पृ. ११४-११५

७. विष्णुबुवा महाराज जोग, (संपादक आणि अनुवादक) ''सार्थ श्री तुकारामाची गाथा'', १९९३, केशव भिकाजी ढवळे प्रकाशन, मुंबई, पृ. २०.

८. प्रल्हाद नरहर जोशी, ''सार्थ तुकाराम गाथा'', खंड पहिला, १९६६, श्री भारत बुक डेपो, मुंबई, पृ. ५६

९. ''श्रीतुकारामबाबांच्या अभंगांची गाथा'', उनि.

**सूची :**

प्रस्तुत निबंधाच्या अखेरीस ह्या दोन सूची जोडलेल्या आहेत. पहिली व्यक्तिनाम सूची व दुसरी पारिभाषिक संज्ञा सूची आहे. निबंधात विवेचनाच्या ओघात आलेली व्यक्तिनामे व पारिभाषिक संज्ञा ज्या क्रमाने आलेल्या आहेत, तोच क्रम सूचींत अनुसरला आहे.



अनुक्रमणिका

**अ) व्यक्तिनाम सूची :**

| | |
|---|---|
| Roman Ingarden : रोमन इनगार्देन | Wolfgang Iser : वोल्फगँग इशर |
| Umberto Eco : उंबर्तो एको | Jonathan Culler : जोनॅथन कलर |
| I. A. Richards : आय. ए. रिचर्डस् | William Empson : विल्यम एम्पसन |
| Edmund Husserl : एडमंड हुसरल | Georges Poulet : जॉर्जस् पुलट |
| Hans Robert Jauss : हॅन्स रॉबर्ट झॉस | |
| Hans Georg Gadamer : हॅन्स् जॉर्ज गदमर | |
| Martin Heidegger : मार्टन् हिडिगर | Paul Ricoeur : पॉल रिकर |
| Sigmund Freud : सिग्मंड फ्रॉईड | Karl Marx : कार्ल मार्क्स |
| E. D. Hirsch : इ. डी. हिर्श | Norman Holland : नॉर्मन हॉलंड |
| David Bleich : डेव्हिड ब्लिश | Stanley Fish : स्टॅनलि फिश |
| Roland Barthes : रोलां बार्त | |

**आ) पारिभाषिक संज्ञा सूची :**

वाचक-प्रतिसाद सिद्धान्त : Reader-Response Theory

भाषिक-कृती विश्लेषण : Text Analysis/Discourse Analysis

| | |
|---|---|
| वि-रचना सिद्धान्त : De-construction Theory | चिन्हमीमांसा : Semiology |
| वाचिक वर्तन सिद्धान्त : Speech Act Theory | ग्रहणसिद्धान्त : Reception Theory |
| नवसमीक्षा : New Criticism | संज्ञा-मीमांसा : Phenomenology |
| शैलीमीमांसा : Stylistics | निकट वाचन : Close Reading |
| संरचनावादी काव्यशास्त्र : Structuralist Poetics | |
| साहित्यिक क्षमता : Literary Competence | |
| सहसर्जक वाचक : Co-creator Reader | गर्भित वाचक : Impied Reader |
| प्रत्यक्ष वाचक : Actual Reader | नमुनादर्शक वाचक : Model Reader |
| आदर्श वाचक : Iedal Reader | रूपवाद : Formalism |
| आकांक्षा-क्षितिज : Horizon of expectation | प्रदत्तता : Givenness |
| अर्थनिर्णयन : Hermeneutics | अर्थनिर्णयनवादी : Hermeneutic |
| अर्थ : Meaning | अभिप्राय : Significance |
| वाचकवर्ग : Interpretitive community | सहसर्जन : Co-creation |
| सौंदर्यवस्तू : Aesthetic object | चेतक : Stimulant |

■

डॉ. दिलीप धोंडगे
'कल्पकता', पं. ध. पाटील नगर, सटाणा ४२३ ३०१ जि. नाशिक.

## सहावे प्रांतिक संमेलन
### (२४-२५ नोव्हेंबर २००१)

### निवेदन

मध्यप्रदेशातील मराठी समाजाच्या भाषेची, साहित्याची, संस्कृतीची आणि कलेची अभिवृद्धी व जोपासना करण्याच्या महान उद्देशाने प्रेरित होऊन मार्च १९६३ मध्ये 'मध्यप्रदेश मराठी साहित्य संघा'ची स्थापना करण्यात आली आणि अ. भा. मराठी साहित्य महामंडळाची समाविष्ट संस्था म्हणून या संस्थेला मान्यता मिळाली.

संस्था स्थापनेपासून गेली चाळीस वर्षे ही संस्था आपल्या ध्येयाची वाटचाल निरंतर करीत आहे. या प्रदेशातील अनेक कवी, लेखक, नाटककार, कादंबरीकार, कथालेखक आणि समीक्षकांना या संस्थेने प्रांतिक व अखिल भारतीय व्यासपीठ मिळवून दिले आहे. चोखंदळ रसिक श्रोत्यांसाठी दर्जेदार कार्यक्रम सादर केले. इतकेच नव्हे, तर पाच प्रांतिक संमेलने यशस्वीपणे घडवून आणलीत. पाचवे मराठी प्रांतिक संमेलन उज्जयनी येथे मार्च १९९५ मध्ये यशस्वीरीत्या संपन्न झाले. आता सहावे प्रांतिक संमेलन भोपाळला साजरे करण्याचे आम्ही योजिले आहे.

अ. भा. साहित्य महामंडळाचे अध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर व इंदूरचे डॉ. प्र. ना. कवठेकर यांच्या उपस्थितीत होणारे हे संमेलन शनिवार व रविवार दि. २४ व २५ नोव्हेंबर २००१ रोजी तुलसी नगरातील महाराष्ट्र समाज भवनात साजरे केले जाईल. सेवानिवृत्त न्यायमूर्ती प्र. के. तारे व महाराष्ट्र समाज भवन ट्रस्टचे सचिव चिंतामण कांड यांचा भरपूर सहयोग व मार्गदर्शन लाभले आहे. या संमेलनात उद्घाटन सोहळा परिसंवाद, कविसंमेलन, खुले अधिवेशन व मनोरंजन असे विविध कार्यक्रम केले जातील. या निमित्ताने पुण्याच्या व मध्यप्रदेशाच्या नामवंत मराठी साहित्यिकांचे विचार ऐकण्याची सुवर्णसंधी लाभेल.

हे सहावे प्रांतिक मराठी संमेलन यशस्वी करण्यासाठी आपल्या सर्वांच्या सहयोगाची आवश्यकता आहे. अतएव एक स्वागत-समिती स्थापना करण्यात येत आहे. मध्यप्रदेशातील कोणत्याही वयस्क व्यक्तीला रु. १५१/- देऊन प्रतिनिधी होता येईल. तसेच या महत्त्वपूर्ण कार्यासाठी रु. ५००/- किंवा अधिक देऊन हितचिंतक सभासद होता येईल. विविध कार्यक्रमासाठी प्रायोजकांचे आम्ही स्वागत करितो. सर्व प्रतिनिधींना दोन दिवसाच्या सर्व कार्यक्रमांचा लाभ घेता येईल. रविवार दिनांक २५-११-२००१ रोजी सर्व प्रतिनिधीसाठी दुपारचे भोजन व चहा-कॉफी नि:शुल्क देण्याची व्यवस्था करण्यात येईल.

मध्यप्रदेशातील मराठी भाषा, साहित्य एवं संस्कृती प्रेमी मंडळींना आमचे

कळकळीचे आवाहन आहे की, त्यांनी मोठ्या संख्येने स्वागतसमितीचे सदस्य व्हावे आणि हे संमेलन सफल करण्याकरिता तन-मन-धनाने मदत करावी. धन्यवाद.

**आपले कृपाभिलाषी,**

| | |
|---|---|
| डॉ. सौ. प्रतिभा गुर्जर | गो. दा. लिमये, अध्यक्ष |
| अनुराधा जामदार | अरविंद खरे, उपाध्यक्ष |
| व. ग. देशमुख, इंदूर | सुधाकर आंबेकर, कोषाध्यक्ष |
| मोहन आचार्य, इंदूर | डॉ. वामनराव पाठक, कार्यवाह |
| डॉ. राम देशमुख, ग्वाल्हेर | माधव साठे, सहकार्यवाह |
| वसंत श्रीधर कुंटे, ग्वाल्हेर | मा. गो. जामदार |
| डॉ. शरद महाजन, जबलपूर | सुरेश महकर |
| डॉ. वि. मा. पागे, उज्जैन | वसंत सप्रे |
| डॉ. अर्पणा जोशी, उज्जैन | ना. का. पथे |
| वसंत देशपांडे, खांडवा | श्रीकृष्ण फडके |

**कार्यकारी मंडळ, म. प्र. मराठी साहित्य संघ, भोपाळ**

# कलेचे कातडे : साहित्यविश्वावरील एक भेदक प्रकाशझोत

❑

प्रा. शंकरानंद येडले

❑

*('कलेचे कातडे' : ले. आनंद यादव, प्रकाशक : मेहता पब्लिशिंग हाऊस, १२१६ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०, पृ. २६८, मूल्य : रु. २००/-)*

**डॉ.** आनंद यादव यांनी एका लेखकाच्या जीवनाचा शोध, त्या लेखकाचे यश-अपयश आणि खरे-खोटे वर्तन कादंबरीच्या निमित्ताने वाचकासमोर ठेवले आहे. लेखकाचे समीक्षकाशी असलेले नाते, वाचकाची लेखकाविषयी असलेली मत-मतांतरे, प्रसिद्धीच्या वलयात वावरणारा ऐटदार लेखक, वाचक व टीकाकारांच्या दृष्टीने लेखकाविषयी लोकमनात काय भावना असतात, लेखकाचे वैयक्तिक-कौटुंबिक जीवन कसे असते, लेखक जसा लिहितो, तसा तो राहतो काय, लेखकाचे लेखनविषयक अनुभव आणि जीवनाविषयक अनुभव या संबंधातून लेखक कसा घडतो, कसा बोलतो आणि कसा वागतो, एकूणच लेखकाचा वाङ्मयीन व जीवनविषयक दृष्टीकोन स्वार्थी, संधीसाधू, प्रसिद्धीलोलूप, खुशालचेंडू, भोगवादी, चंगळवादी कसा असतो, माणूस म्हणून लेखक स्वत:च्या जीवनात जर मुक्तपणे, बेमुर्वतखोरपणे जगत असेल तर त्या लेखकाच्या जीवनाची शोकांतिका हळूहळू कशी होत जाते, याची प्रत्ययकारी जाणीव 'कलेचे कातडे' ही कादंबरी देते.

माणूस हा सामाजिक प्राणी आहे; तो बुद्धिवादीही आहे. तो समाजात राहतो. समाजाची मूल्ये पाळून, मानवी संस्कृतीला धरून तो जीवन जगतो. या दृष्टीने लेखक हा ज्या समाजात राहतो, लिहितो, आपल्या साहित्यामुळे तो प्रसिद्धी मिळतो अनेक मान-सन्मान, पुरस्कार मिळवतो; तसेच तो ज्या गावचा त्या गावाचे, लेखकाचया घराचे नाव त्याच्यामुळे मोठे होते आणि या सर्वांमुळे लेखक हा त्या समाजातील वाचकांचया मनोमन एक आदर्श वनत असतो. लेखकाचे जीवन हा वाचकांच्या कुतुहलाचा विषय असतो. लेखकाच्या साहित्यामुळे, त्याच्या मोठेपणामुळे लेखकाला समजून घेण्याची जिज्ञासा वाचकाच्या मनात असते. असा लेखक जर कलेचे कातडे पांघरून, वाङ्मयचौर्य करू लागला आणि कलेचेच वस्त्रहरण करू लागला, कलेच्या नावाखाली भोगवादी जीवन जगू लागला, तर समाजाने त्याला सन्मानित करावे काय ? कारण अप्पासाहेब कुलकर्णी या लेखकाला हितसंबंधी समीक्षकांनी ठरवून पुरस्कार दिला आहे. या लेखक व समीक्षकांमध्ये मैत्रीपोटी देवघेव होत असते. एकत्र खाणे-पिणे चाललेले असते. 'आपला एक लेखकमित्र आपण मोठा करू' म्हणून जो लेखक वाङ्मयचौर्य करून स्वत: साहित्यकृती लिहून प्रसिद्ध करतो, त्यालाच त्याच्या गटातील समर्थाक, समीक्षक ठरवून मोठे करतात, पत्रकार मुलाखती घेतात आणि प्रसिद्धी देतात.

मराठी वाङ्मय क्षेत्रातील असले, भ्रष्ट वातावरण 'कलेचे कातडे या कादंबरीत यादवांनी प्रत्ययकारी आणि प्रभावी शैलीत रेखाटले आहे.

या कादंबरीतील नायक अप्पासाहेब जे जीवन जगतात, ते जीवन वाचकांना आकर्षक वाटणारे आहे. अप्पांच्या जीवनाची जी रंगेलपणाची, सुखवादी, नैतिक-अनैतिकता बाजूला ठेवून मुक्तपणे अनुभव घेऊन जगण्याची जी जीवनशैली आहे, ती 'कलेचे कातडे' या कादंबरीभर यादवांनी मोठ्या चातुर्याने दाखवून दिली आहे. वरवर विचार करणाऱ्या सामान्य वाचकांना अप्पांचे हे ऐटदार जीवन निश्चितपणे आकर्षक वाटते. पण अप्पांपासून तुटलेले अप्पांचे भाऊ, गावाकडचे नातेवाईक, गावकरी, पत्नी, मुले, प्रयसी ही गणगोत मंडळी आणि त्यांनी केलेले वाङ्मयचौर्य हे सर्व पाहता अप्पासाहेब कुलकर्णी यांनी जे जीवन अनुभवले, त्या जीवनात जे चोरून, फसवून, लबाडी करून मिळविले ते योग्य आहे काय, असा प्रश्न सुजाण, अभ्यासू वाचकाच्या मनात शेवटी अपरिहार्यपणे उद्‌भवतो. परिणामी अप्पासाहेबांचे जीवन हे एका विकृत, स्वार्थकेंद्री माणसाचे जीवन वाटू लागते. त्या दृष्टीने 'कलेचे कातडे'ची मांडणी आणि लेखनशैली विलक्षण वेगळी आणि मर्मभेदी वाटते.

या कादंबरीतील नायक लेखक हा कलावादी प्रवृत्तीचा आहे. तो दुसऱ्याची ग्रंथरूप माहिती चोरतो आणि तिला कलेचे रूप देऊन 'भक्ष्यान्तर' ही कादंबरी लिहितो. अशा प्रकारची चोरी ही कलावादी तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने चोरीच होऊ शकत नाही. त्यामुळे 'भक्ष्यान्तर' ही कादंबरी स्वतंत्रच साहित्यकृती आहे, असा पवित्रा तो शहाजोगपणे घेतो. बुद्धिभेद करून कलावादी विचारांचा फायदा घेतो. कलावंत लेखक म्हणनू खोटी प्रतिष्ठा मिळवतो. समीक्षक, लेखक, पत्रकार इत्यादींना पार्ट्या देऊन मोठा लेखक होतो. या बरोबरच व्यक्तिस्वातंत्र्याच्या नावाखाली वैयक्तिक जीवन भोगविलासी ठेवून, स्त्रियांशी संबंध बाळगून कामुक जीवन उपभोगतो व त्यातच रमतो. याशिवाय व्यसनाच्या आहारी गेल्याने या लेखकाला निरनिराळे रोग होतात व माणूस म्हणून निरोगी जीवन जगण्याऐवजी अंतर्बाह्य तो रोगटच जीवन जगतो. शेवटी व्यसनातिरेकामुळे सडून, कुजून संपून जातो. अशा रीतीने लेखक अप्पासाहेब 'कलेचे कातडे' पांघरून वावरले. त्या पांघरुणाखालीच त्यांच्यातील पशू आत्मनाश ओढवून घेतो. तिथे प्रस्तुत कादंबरी संपते.

सारांश जीवन आणि कला या दोन्ही क्षेत्रात स्वत:चे अस्तित्व हरवून बसलेले अप्पासाहेब कुलकर्णी हे जीवनवादीही नाहीत आणि कलावादीही नाहीत; तर स्त्रीलंपट, भोगविलासी, भौतिकवादी, चंगळवादी आहेत. ऐटदारपणे जगण्याच्या नावाखाली स्वत:चे जीवन स्वत:च कसे उद्‌ध्वस्त करतात, याचे प्रत्ययकारी दर्शन प्रस्तुत कादंबरीत घडते. 'करावे तसे भरावे' या न्यायाने स्वत:च ते संकटात सापडून दु:खाच्या खाईत लोटले जातात. बाह्यांगानेच नव्हे; तर शारीरिक, मानसिक, आत्मिक, सामाजिक दृष्टीनेही नीतिमूल्ये सोडून, चोरून, लपून वागणारा दांभिक माणूस कसा संपतो, हे कळते. ज्याला भावना असूनही त्या भावना स्वार्थकेंद्री भोगवादी असतील, ज्ञान असूनही त्यात स्वार्थीवृत्ती असेल, तर माणूस आणिपशू यांच्यात काही फरक नाही. शेवटी मपानवी जीवन हे मानवतेचे, नीतिमूल्यांचे आहे. मूल्ये सांभाळूनच व्यक्तीची, कुटुंबाची व समाजाची प्रगती होते. लेखक अप्पासाहेबांच्या जीवनातील व कलेतील विसंगतीचे हे भेदक जीवनचित्रण आहे. या अनुषंगाने आजच्या मूल्यऱ्हासाच्या व्यक्तिवादाच्या, दत्ता-संपत्तीचा मोह असलेल्या कामातुर प्रवृत्तीच्या भोगवादी, खुशालचेंडू मानसिकतेचेही हे चित्रण वाटते. विशेषत: असे दुर्गुण नागरी मध्यमवर्गीय प्रवृत्तीत उच्चभ्रू समजल्या जाणाऱ्या संस्कृतीत अधिक दिसून येतात. अशाच प्रवृत्तींचे



अनुक्रमणिका

समर्थन करणाऱ्या ऐदी, अत्मकेंद्री, व्यक्तिवादी प्रवृत्तींना समजून घेण्याच्या दृष्टीने 'कलेचे कातडे' ही कादंबरी प्रेरक व मार्गदर्शक ठरते. ती लेखक-वाचकांना डोळस बनविते. जीवनाच्या प्रयोगशाळेतील एक 'सत्य' समोर ठेवते. कलात्मक पातळीवर व्यक्त झालेला अस्सल जीवनानुभव वाचकासमोर या कादंबरीतून येतो.

डॉ. आनंद यादव यांनी प्रस्तुत कादंबरीत कलावादाचे महत्त्व नाकारले नाही. कलावादी विचार हा कलेला स्वतंत्र आणि स्वायत्त मानतो. कला ननैतिक मानतो; नीती-अनीतीच्या पलीकडची मानतो. जीवनाचा अनुभव 'अनुभव' म्हणूनच घेण्याच्या दृष्टीने कलावादाचा विचार महत्त्वाचा आहे. त्याचे साररूप तारतम्याने समजून घेतले पाहिजे, हे डॉ. यादव मान्य करतात. पण कलावादाचे तत्त्वज्ञान विपर्यस्त स्वरूपात वापरून, कलेच्या नावाखाली काळे धंदे करणे, ब्लॅकमेल करणे, चोरी करणे कसे वाईट आहे, हे सांगण्याचा त्यांचा हेतू कादंबरीत स्पष्ट दिसतो. कलावाद हा विचार म्हणून स्वीकारताना प्रत्यक्ष व्यवहारात त्याचा विपर्यास करून जो त्याचा दुरुपयोग होतो, त्याकडे ते लक्ष वेधताना दिसतात. त्याचबरोबर कलावादाचा विपर्यास हा पर्यायाने जीवनाचाच विपर्यास कसा होतो, कलावंत लेखकाचे कलेशी आणि जीवनाशी असलेले नाते विसंगत असेल तर साहित्याचे आणि समाजाचेही कसे नुकसान होते, हे डॉ. यादव सुचवू पाहतात.

सामाजिक आणि मानवी जीवनाचा अर्थपूर्ण आशय अपरिहार्यपणे आत्मस्थानी येणाऱ्या साहित्यकलेत कलामूल्ये आणि जीवनमूल्ये वेगवेगळी असू शकत नाहीत. त्यांचा योग्य तो समन्वय साधल्याशिवाय श्रेष्ठ, दर्जेदार साहित्यकृती निर्माणच करता येत नाही. त्याचा समन्वयच नसेल तर खरा साहित्यिक कलावंत स्वत:चे आणि समाजाचेही मूल्यात्मक जीवन घडवू शकत नाही. तो कलेची सेवा करणारा खराखुरा कलावंत होऊच शकत नाही, हे सांगण्याच्या धडपडीतून डॉ. यादवांनी 'कलेचे कातडे' ही कादंबरी लिहिलेली दिसते.

डॉ. यादवांच्या प्रस्तुत कादंबरीतील पात्रे स्वतंत्र स्वभावाची, स्वतंत्र व्यक्तिमत्त्व असलेली, स्वतंत्रपणे विचार करणारी आहेत. त्यामुळे ती जिवंत वाटतात. कादंबरीत स्वतंत्रपणे, जिवंतपणे जीवन वास्तव उभे करतात. वाचकाच्या मनासमोर ती वावरू लागतात. नायकाच्या भोवती एक वास्तव सृष्टी निर्माण करतात. प्रत्येक महत्त्वाचे पात्र हे कोणत्या ना कोणत्या जीवनमूल्याचे प्रतीक म्हणून आलेले किंवा त्या मूल्याचा ध्यास घेऊन बोलणारे वाटते.

... कलावादामध्ये असलेल्या गुणात्मक व सक्षम बलस्थानबरोबरच मानवी जीवनातील मूलभूत तत्त्वांचे व मूल्यांचे सार आत्मसात करून, डॉ. यादवांचा कलेकडे व जीवनाकडे समतोलपणे पाहण्याचा दृष्टिकोन दिसतो. साहित्यिक कलावंताच्या या दुपेडी जीवनाचे दर्शन 'कलेचे कातडे' मधून यादवांनी जे घडविले आहे; ते केवळ वाचकालाच नव्हे, तर वाङ्मयाच्या अभ्यासकालाही मोलाचे वाटणारे आहे. -

डॉ. आनंद यादव आशा-निराशा, सुख-दु:ख, खरे-खोटे, सत्य-असत्य, बुद्धी-भावना यांमधल्या दोन्ही बाजू स्वीकारून तटस्थपणे जीवनाकडे पाहतात. लेखक म्हणून स्वत:चे अलिप्तपण सांभाळून यादवांचे मौलिक चिंतन त्यांच्या समर्थ अनुभवातून, अभ्यासातून, निरीक्षणातून आणि अंतिमत: लेखनातून प्रकट होताना दिसते. एक प्रयोगशील निर्मात्या आनंद यादवांचा विचार करणे

अपरिहार्य होऊन बसते.

सारांश, डॉ. यादव जीवनवादाला कलात्मकतेचा चैतन्यस्पर्श देणारे समन्वयवादी कलावंत आहेत, याचा पडताळा 'कलेचे कातडे' या कादंबरीच्या अंगोपांगातून येतो. ■

प्रा. शंकरानंद येडले
ॲड. राजमाने निवास, शिवनगर, लातूर ४१३ ५१२. (मराठवाडा). दूरध्वनी : ५६९११

**कै. शशिकलाताई आगाशे स्मृती बाल वाङ्मय पुरस्कार**

कथा, कादंबरी, चरित्र, आठवणी, नाटिका, नाटक, कविता इत्यादी सर्व प्रकारातील स्वतंत्र साहित्य किंवा अनुवादित बालसाहित्य या पुरस्कारासाठी पात्र राहतील. ३१ जानेवारी २००२ ला कै. शशिकलाताई आगाशे यांच्या स्मृतीदिनाला आयोजित बाल आनंद मेळाव्यात सदर पुरस्कार वितरण समारंभ लेखकाच्या प्रत्यक्ष उपस्थितीत देण्यात येतो. पुरस्काराच्या स्वरूपात भारत विद्यालय परिवारातर्फे प्रत्येकी पाच हजार एकचे पारितोषिक दोन पुस्तक स्वरूपातील साहित्य कृतींना देऊन सन्मानित करण्यात येईल.

सदर पुरस्कारासाठी स्वत: लेखकांनी किंवा प्रकाशकांनी प्रवेशिकेच्या स्वरूपात प्रकाशित बालसाहित्याच्या प्रत्येकी दोन प्रती १५ डिसेंबर २००१ पर्यंत पाठविण्याचे आवाहन मुख्याध्यापक, भारत विद्यालय, बुलडाणा यांनी केले आहे.

पुस्तके पाठविण्याचा पत्ता - बालसाहित्य पुरस्कार समिती, द्वारा मुख्याध्यापक, भारत विद्यालय, बुलढाणा, ता. जि. बुलढाणा ४४३ ००१. फोन नं. (०७२६२) ४२३५४

# आधुनिक काव्यसमीक्षक :
## रा. श्री. जोग आणि रं. श्री. मुगळी

❑

डॉ. पंडित आवळीकर

❑

रा. श्री. जोग आणि रं. श्री. मुगळी हे अनुक्रमे मराठी आणि कन्नड या भाषांतील नामवंत काव्यसमीक्षक आहेत. ते नुसतेच समकालीन नव्हेत, तर समवयस्कही आहेत आणि समव्यवसायीही आहेत. एवढेच नव्हे, तर जोग आणि मुगळी या दोघांनीही अनुक्रमे मराठी आणि कन्नड वाङ्मयाचे प्राध्यापक म्हणून एकाच संस्थेत (डेक्कन एज्युकेशन सोसायटीत) — आजीव सदस्य म्हणून काम केले. एकमेकांचे जवळचे सहकारी म्हणून सांगलीला विलिंग्डनमध्ये ते एकत्र होते.

जोग आणि मुगळी हे दोघेही मुळात कविप्रकृतीचे आहेत. कवी आहेत. आपले काव्य 'हा साराच वेडेपणा' (१९७४) आहे, असे स्वत: जोगांना वाटले, तरी तो तसा नाही असे तटस्थ काव्यरसिकाला वाटेल. मुगळी यांची काव्यसाधना त्यांच्या काव्यसमीक्षेमुळे बाधित झाली नाही, चालूच राहिली. 'बासिग' (१९४०), 'ॐ अशांति' (१९५०), 'अपार करुणे' (१९५१) आणि 'नवमानव' (१९७१) हे त्यांचे काव्यसंग्रह. 'निशिगंध' आणि 'रसिकरंग' या उभयतांच्या टोपणनावांतून दोघांच्याही सौंदर्यवादी वृत्तीतील गंध आणि रंग प्रकट होतात. काव्यविषयक 'गुंतवणुकी'मुळे दोघांचीही काव्यसमीक्षा शबलित झाली नाही. कोणतीही काव्यविषयक आकांक्षा उरलेली नसल्याने इतरांच्या काव्यनिर्मितीकडे वस्तुनिष्ठ दृष्टीने आपण पाहू शकू, याचे जोगांना समाधान वाटताना दिसते. एकंदर काव्यावलोकनात स्वत:च्या काव्याबद्दल लिहिताना व्यक्त होणारी उभयतांची सुसंस्कृतता, पुढे-मागे अपवादात्मकच ठरेल.

कवितेच्या मांडवाखालूनही न गेलेले काव्यसमीक्षक (आणि) कवी-समीक्षक (Poet-Critics) यांच्या काव्यधारणेत आणि काव्यचर्चेत लक्षणीय अंतर पडू शकते, याचे प्रत्यंतर काव्यसमीक्षकांवर नजर टाकताच येते आणि कवी-समीक्षक हे 'अनन्य' वाटू लागतात. वास्तविक असे का घडावे ? जोग आणि मुगळी यांच्यातील 'कवी' त्यांच्या काव्यसमीक्षेशी आपले कोणते नाते जोडतो अगर तोडतो, हा प्रश्न तेवढा येथे उपस्थित करून ठेवतो. मुगळी आपल्या समीक्षेत काही वेळा 'काव्य' आणतात. जोग सहसा तसे करीत नाहीत. हेही मला येथे नमूद करावेसे वाटते की, संस्कृत काव्यशास्त्राच्या व्यासंगामुळे या दोघांनाही भारतीय काव्यविचाराची ठाम बैठक लाभलेली आहे. 'अभिनव काव्यप्रकाश' हा ग्रंथ म्हणजे जोगांच्या काव्यसमीक्षेचा 'गृहपाठ' (Homework) आहे. मुगळींचा संस्कृतचा अभ्यास ग्रंथरूपाने आपल्यासमोर नाही. या दोघांचे इंग्रजी कवितेचे अध्ययन (इंग्रजीचे अध्यापनही) त्यांच्या समीक्षेला 'श्रीमंत' बनविताना दिसते.



अनुक्रमणिका

याचबरोबर या दोघांनीही आधुनिक काव्याबरोबरच प्राचीन काव्याचाही डोळस विचार केलेला आहे. 'मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन' (१९५९) या पुस्तकात जोगांनी आणि 'कन्नड साहित्यद इतिहास' (१९६३) या ग्रंथात (पहिली २० प्रकरणे) मुगळींनी प्राचीन काव्यसमीक्षक म्हणून आपले सामर्थ्य व्यक्त केले आहे. प्राचीन काव्याच्या सखोल अध्ययनामुळे प्राप्त झालेले गतकालाचे भान (Sence of the Past) आधुनिक काव्याची समीक्षा करताना जोग आणि मुगळी यांनी प्रकट केले आहे. आपण 'काव्या'बद्दल बोलत आहोत, ही त्यांची विशुद्ध वाङ्मयीन दृष्टी मोलाची आहे.'

'कविता' आणि 'काव्य' यातील सूक्ष्म आणि तरल अंतर या दोघांच्या मनात नेहमीच जागे असते, याचीही नोंद करावीशी वाटते. पण हे अंतर त्यांच्या समीक्षेत कोठेही वटवटीतपणे व्यक्त होत नाही.

जोग म्हणतात : "चोखामेळा, गोरा कुंभार, सावता माळी इत्यादी ज्ञानेश्वर प्रभावळीतील संत संतत्वात ज्ञानेश्वरांच्या तोलाचे होते, असे एकवेळ म्हणता आले, तरी वाङ्मयनिर्मितीत किंवा तद्विषयक अभिरुचीत ते समान योग्यतेचे होते, असे म्हणता येणार नाही." तर 'पूर्वपुराण' (जिनसेनाचार्य) आणि 'आदिपुराण' (पंप) या ग्रंथांबद्दल मुगळी लिहितात : "दोन्ही ग्रंथ जैन पुराणे, दोन्हींमध्ये काव्याचे सत्त्व आहे. पण 'पूर्वपुराणा'त काव्यापेक्षा पुराणदृष्टीच जास्त. 'आदिपुराणा'त पुराणापेक्षा काव्यदृष्टी जास्त."

जोग आणि मुगळी यांची आधुनिक काव्यसमीक्षक म्हणून तौलनिक पाहणी करताना 'अर्वाचीन मराठी काव्य' (१९४५) हे पुस्तक, 'मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन'मधील 'अर्वाचीन काल' (१८००-१९२०) हे अखेरचे प्रकरण आणि 'प्रदक्षिणे'तील जोगांचे लेखन डोळ्यांपुढे ठेवले आहे. मुगळींच्या 'कन्नड साहित्यद इतिहास' मधील 'होस साहित्यद उंदय' (प्र. २१), 'होस साहित्यद मोदल हंत' (१८२०-१९२०, प्र. २२), होस साहित्यद यर्डनेय हंत' (१९२१-१९५८, पृ. २३), 'होस काव्य' (प्र. २४) हे विवेचन येथे प्रस्तुत आहे.

जोग आणि मुगळी एकमेकांचे समानधर्मे आहेत : व्यक्ती म्हणून आणि काव्यसमीक्षक म्हणून. संयम आणि समतोल हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि समीक्षेचा सह'ज' धर्म आहे. सूचकता आणि मार्मिकता हे मर्म आहे. अवाजवी स्तुती वा निंदा या दोषांपासून त्यांची समीक्षा म्हणूनच मुक्त आहे. त्यांना एखादी काव्यकृती अगर काव्यप्रवृत्ती आवडली, एखादा कवी आवडला तरी, त्यांची आवड संयमानेच व्यक्त होते, बेहोषीने नव्हे. जोगांची न्यूनोक्ती (Under Statement) ही मराठीत वाक्प्रचारवजा (Proverbial) आहे. जोग ठामपणाने काही(ही) सांगत नाहीत, असा त्यांच्यावर आक्षेप घेतला जातो. परंतु, हे कितपत खरे आहे, याचा स्वच्छ विचार आता झालाच पाहिजे.

केशवसुत हे जोगांचे (तसे) आवडते कवी. त्यांच्यावर जोगांनी एक स्वतंत्र ग्रंथही लिहिला. पण जोगांचा पुढील उतारा त्यांच्या समीक्षेची सगळी वैशिष्ट्ये स्पष्ट करणारा आहे. "केशवसुतांनी मराठी कवितेला निराळे वळण लावण्याचा प्रयत्न मनापासून केला व त्यात

त्यांना यशाही मिळाले. अर्वाचीन मराठी कवितेचे जनक असे त्यांना म्हणावयाचे ते याचकरिता. याच अर्थाने त्यांना क्रांतिकारकही म्हणता येते. सामाजिक क्रांतीचे विचार त्यांच्या कवितांत आले व प्रथम त्यांनीच आणले म्हणून त्याही अर्थाने त्यांना क्रांतिकारक पाहिजे तर म्हणावे. पण महाराष्ट्रामध्ये सामाजिक क्रांती झाली असल्यास इतर अनेक गद्य लेखक, आणि बदलती परिस्थिती यांना तिचे श्रेय फार अधिक प्रमाणात द्यावे लागते, हे येथे लक्षात घेणे आवश्यक आहे. स्वत: केशवसुतांना 'नवी काव्ये' लिहिण्यापलीकडे अधिक क्रांतिकारकत्व पाहिजे होते की नाही, हे सांगता येत नाही. काव्यातील क्रांतिकारकत्व मात्र त्यांच्याचकडे जाईल आणि एवढे झाले तरी केशवसुतांचे मोठेपण वादातीत राहील.'' (अर्वाचीन मराठी काव्य : पृ. ५७)

'यशा**हि**', 'क्रांतिकारक**हि**', 'त्या**हि**' या शब्दांतून सुचविली जाणारी दुसऱ्या कशाची तरी शक्यता; 'पाहिजे तर म्हणावे'मधील अर्धसंमती, 'सामाजिक क्रांती झाली असल्यास'मधील संशय, 'हे सांगता येत नाही'मधील अनिश्चितता, 'एवढे झाले तरी'मधील किमान अपेक्षा — या सर्वांच्या पार्श्वभूमीवर 'याचकरिता', 'याच अर्थाने', 'त्यांनीच', 'त्यांच्याचकडे' या शब्दांतील 'च'कार जोगांच्या विरुद्ध अनिश्चिततेच्या आरोपाचा चकार शब्दसुद्धा काढू नये, इतका ठाम आहे. या अवतरणाशेजारीच तांबे यांच्यासंबंधी जोगांनी उच्चारलेले भरतवाक्य नोंदवावे असे आहे : ''पण आज तांबे यांच्या कवितेचे खरे यश सौंदर्यदृष्टी ठेवून आस्तिक्य बुद्धीच्या बैठकीवरून, समाधानी वृत्तीने केवळ आपल्याच नव्हे तर इतरांच्याही सुख-दु:खांत समरस होऊन आनंदाचा आस्वाद घेण्याच्या भूमिकेमध्ये आहे. विकलता, विषमता, विघटना यांमुळे निर्माण झालेले मनाचे अस्वास्थ्य प्रकट करणाऱ्या आजच्या काव्याच्या जमान्यात निर्भेळ काव्यवादाचे प्रतीक म्हणून तांबे यांचे काव्य उपयोगी पडले, तरी त्यांच्या कवितेने मोठे कार्य केले असे म्हणता येईल. पण उपयोग, कार्य हे विचार काव्याबाबत गौण वा अप्रस्तुत म्हणावयास हवेत. काव्य हे काव्य असले म्हणजे झाले व तांब्यांची कविता काव्य आहे, यातच सारे आले. तिचे अस्तित्वकारण किंवा उपयोगित्व याकडे पाहण्याचे कारण काय? 'Beauty is its own excuse for being' असे इमर्सनने म्हटले आहेच.'' ('तांबे यांची समग्र कविता', संपा. रा. श्री. जोग, व्हीनस प्रकाशन, पुणे, प्रस्तावना : पृ. ३०.)

केशवसुतांचे मराठी कवितेत जे स्थान आहे, तसेच कन्नड कवितेत बी. एम्. श्रीकंठय्य (१८८४-१९४८) यांचे आहे. पण आधुनिक काव्यातील क्रांतिकारकत्व मराठीपुरते केवळ केशवसुतांना जोगांनी दिले असले, तरी कन्नडपुरते केवळ बी. एम्. श्री. यांना देणे मुगळींना मान्य नाही. श्रीकंठय्यांचे कवी म्हणून मोठेपण 'इंग्लिश गीतगळु' (१९२१) या त्यांच्या काव्यसंग्रहाविषयी लिहिताना मुगळी यांनी अत्यंत संयत शब्दांत सांगितले आहे : ''मुळाला अनुरूप असे सर्व छंद:प्रकार व पदपुंज निर्माण करून 'इंग्लिश गीतगळु' हा अनुवादपर ग्रंथ स्वतंत्र भावगीतांच्या परंपरेचा पाया बनला. असे करताना 'श्रीं'नी जुन्या परंपरेचे सारग्रहण केल्यामुळे त्यांच्या या कृतीला आणखी एक महत्त्व प्राप्त झाले. त्यामुळे तरुण कवींमध्ये नव्या काव्याच्या निर्माणाचे स्वप्न पाहायला प्रेरणा दिली. एका नव्या शैलीचा नमुना नजरेपुढे ठेवला. एकंदरीत कन्नड साहित्याच्या पुनरुत्थानाला स्फूर्ती दिलेल्या श्रेणीमध्ये एक, म्हणून त्यांचे नाव

चिरकाल टिकून राहील.''

तांवे यांच्या शेजारीच कवी म्हणून ज्यांचे आसन मांडावे, असे श्रेष्ठ कन्नड कवी बेंद्रे, हे मुगळींचे आवडते कवी. पण त्यांचे अतिशय वस्तुनिष्ठ मूल्यमापन मुगळी कसे करतात, हे पाहण्यासारखे आहे : ''बेंद्रे यांच्या कृतीमध्ये कधीकधी मूर्तापेक्षा अमूर्ताचा आविष्कार जास्त असतो. श्री. अरविंदाचे तत्त्व व काव्य यांनी त्यांचे जीवन व व्यक्तित्व घडविले आहे. विविध शास्त्रांशी सामना करून शब्द पिंजून पिंजून त्यांनी स्वत:साठी रचलेला सिद्धांत त्यांच्या काव्यात प्रतिबिंबित झाला आहे. या सर्वांचा परिणाम असा की, एक प्रकारची गूढता, क्लिष्टता, त्यांच्या निर्मितीमध्ये वारंवार दिसून येते. काही ठिकाणी शब्दांची रेलचेल, प्रासांची उधळपट्टी प्रधान होऊन मूळचे सत्त्व नजरेआड होऊन जाते. हे काहीही असो, एक मूलगामी विश्वप्रज्ञा व विचारधारा परिपक्व कृती होऊन, विपुल अर्थाने पुष्ट होऊन, त्यांच्या उत्तम कवनांमध्ये अभिव्यक्त झाली आहेत. नव्या काव्याला एक असामान्य कळा त्यांनी आणली आहे.''

जोग आणि मुगळी हे तसे 'जुन्या' पिढीतील समीक्षक. त्यांना नवकाव्य समजत नाही, समजू शकत नाही असा खरा-खोटा प्रवाद निर्माण व्हावा, अशी त्यांची वाङ्मयीन जडण-घडण झालेली. पण जोगांनी नवकाव्यासंबंधी जे लेखन केले, त्यामुळे ते वा. ल. कुलकर्णी यांच्याहूनही आधुनिक (की अद्ययावत ?) आणि अधिक समज असणारे नवकाव्याचे टीकाकार ठरले. जोगांनी केलेली नवकाव्य मीमांसा या संदर्भात उद्‌बोधक आहे.

या मीमांसेआधी जवळजवळ चार दशके, जोगांनी नवकाव्याचे एक-दोन विशेष 'अर्वाचीन मराठी काव्या'च्या 'परिशिष्टा'त सांगितले होते. फटकळपणा, निर्भीडपणा, संकोचशून्यता किंवा बेछूटपणा, मुक्तच्छंद स्वीकारामधील स्वैरता, वास्तवता आणि नग्नता यांतील अभेद, संयम म्हणजे कृत्रिम शिष्टपणा हा समज या तपशिलाबरोबरच नवकाव्यातील अस्ताव्यस्तपणा समाजजीवनातून कविमनात आणि तेथून काव्यात आला आहे, असे जोगांनी म्हटले आहे. याहून त्यांची पुढील स्पष्टोक्ती आजच्या म्हणजे त्यांच्या विवेचनानंतर पन्नास वर्षांपुढील काव्याला तंतोतंत लागू पडत आहे. ''भाषेवरील व रचनेवरील अप्रभुत्व हा दोषाचा भाग न राहता भूषणाचा भाग होऊ पाहत आहे. शब्द टराटर फाडण्याची भूमिका ही या सर्वांस फारच उपयोगी पडू लागलेली आहे. काव्याच्या आशयाचे एवढे स्तोम माजविले जात आहे की, तेथे काव्याच्या 'कोण देहाते सांभाळी' अशी स्थिती झाली आहे.''

कन्नडमधील नवकाव्याचे स्वरूप मुगळी नेमक्या शब्दात रेखाटतात : इ. स. १९४७ मध्ये देश स्वतंत्र झाला, पण देशाच्या समस्या सुटल्या नाहीत. लवकर सुटण्याची लक्षणेही दिसेनात. त्यामुळे उद्‌भूत झालेल्या परिस्थितीचे नव्या प्रकारांनी, नव्या प्रतिमांतून निरूपण करावे, अशी प्रेरणा काही कवींना झाली. यामुळे नवकाव्य जन्मास आले. विनायक (वि. कृ. गोकाक) हे त्याचे आद्य प्रवर्तक झाले. त्यानंतर एम्. गोपालकृष्ण अडिग वगैरे कवी पुढे आले. रोमँटिक काव्याचा काळ संपला, अशी हूल उठली. नवकाव्याचे लक्षण, तंत्र, प्रारंभ याविषयी वादंग उठले. नवकाव्यातही विभिन्न मार्ग आहेत, असे दिसते.''

नावड सूचित करण्यातही व्यक्त होणारी दोघांची मार्मिकता एकेका उदाहरणानेसुद्धा

समजण्यासारखी आहे. 'राजा शिवाजी'बद्दल जोग म्हणतात : ''विषय महाकाव्याचा आणि शैली मात्र शिशुकाव्यास अनुरूप अशी स्थिती झाल्याने औचित्य विसंगती होऊन हास्योत्पादकता मात्र पदरात पडली.'' (मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन : पृ. २०४)

आता मुगळींची तऱ्हा पाहा : ''नूरु मर नुरु स्वर' (शेकडो वृक्ष शेकडो स्वर) ही बेंद्रे यांची उक्ती नव्या कालाच्या या पिढीचे यथार्थ वर्णन करते. पुढची 'ओंदोंदु अति मधुर' (एक एक अतिमधुर) ही उक्तीही यथार्थ ठरो, अशी आमची मनीषा.''[१३] मुगळींची मनीषा या पिढीतील माधुर्याचा अभाव समर्थपणाने सूचित करते.

जोग आणि मुगळी यांची काव्यसमीक्षा म्हणजे अनुक्रमे मराठी आणि कन्नड या भाषांतील आधुनिक काव्याची सिंहावलोकने आहेत. हे त्या त्या काव्याचे इतिहास नव्हेत. पुढील काव्येतिहासकाराला अत्यंत उपयुक्त वाटावी, अशी ही विश्वसनीय, गुणदृष्ट्या 'पक्की', पण रूपदृष्ट्या 'कच्ची' सामग्री आहे.

जोगांनी स्वत:च्या काव्यासंबंधी आपल्या समीक्षेत निर्देश केलेला नाही. पण मुगळी यांनी मात्र 'रसिकरंगा'संबंधी (हे त्यांचे काव्यनाम) तटस्थपणे लिहिले आहे : 'रसिकरंगा'च्या काव्यात मार्दव आहे, उत्साह आहे, पण एक प्रकारच्या अर्ध्यामुर्ध्या हुरहुरीने काही ठिकाणी रसपूर्ती होत नाही. भरून आलेले आभाळ पूर्ण पाऊस न पाडता तसेच पुढे चालल्यासारखे वाटते.'' आपल्या काव्यलेखनाला, ते थांबल्यानंतर, जोगांनी 'साराच वेडेपणा' म्हटले. यात त्यांचे विदग्ध शहाणपण आहे. 'मंदार हुवा' (मंदार पुष्प) सारखी मुगळींची कविता तिच्यातील विशुद्ध गीतात्मकता आणि कोमलता यांमुळे अजूनही अम्लान आहे. 'सुसंस्कृत काव्यसमीक्षकांची दोन उदाहरणे म्हणून रा. श्री. जोग आणि रं. श्री. मुगळी हे नेहमीच नुसतेच 'स्मरणीय' नव्हेत, तर 'प्रात:स्मरणीय' वाटत राहतील.

■

प्रा. डॉ. पंडित आवळीकर
मराठी विभाग, गुलवर्गा, विद्यापीठ, गुलवर्गा.

---

## स्वागत

❑ खालील पुस्तके अनामिकाकडून ग्रंथालयास सप्रेम भेट (नवीन पुस्तके)

**झुंज** : ना. सं. इनामदार, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.
**मंत्रावेगळा** : ना. सं. इनामदार, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.
**राऊ** : ना. सं. इनामदार, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.
**शहेनशहा** : ना. सं. इनामदार, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.

❑ खालील पुस्तके श्री. के. पी. भागवत यांनी म. सा. प.ला सप्रेम भेट दिली. (ग्रंथालय)

**वैवाहिक जीवन** : के. पी. भागवत
**व्यायाम दीपिका** : के. पी. भागवत
**शरीर संपदा** : के. पी. भागवत

---

# स्त्रियांच्या विडंबन कविता

❑

डॉ. नीलिमा गुंडी

❑

मराठी काव्यात स्त्रियांच्या काव्याचा एक स्वतंत्र प्रवाह आजमितीला मान्यता पावलेला आहे. स्त्रीगीते, भावकविता, स्त्रीवादी कविता इत्यादी विविध वळणाच्या कवितांबरोबरच काही स्त्रियांनी विडंबनपर कविताही लिहिल्या आहेत, हे मात्र फारसे माहीत नाही. अलीकडे सामाजिक शास्त्रांच्या प्रभावाने साहित्याच्या अभ्यासाला वेगळ्या प्रकारे चालना मिळाली. त्यामुळे वंचितांच्या साहित्याचा अभ्यास करणे सुरू झाले. स्त्री हाही समाजातील एकेकाळचा वंचित घटक होय. साहजिकच विसाव्या शतकाच्या शेवटी स्त्री-साहित्याचे संशोधन सुरू झाले. अशाच एका स्त्रीसाहित्याच्या संशोधनपर प्रकल्पात सहभागी होताना मला स्त्रियांनी केलेल्या काही विडंबनपर कविता वाचायला मिळाल्या. प्रस्तुत लेखात त्यांचा परिचय करून द्यावयाचा आहे.

सर्वसाधारणपणे एक 'विनोदविषय' म्हणून ठरलेली स्त्री खरे तर वास्तविक मार्मिक अशा विनोददृष्टीला पारखी नसते, हे बहिणाबाई चौधरींच्या कविता वाचताना लक्षात येते. स्त्रियांच्या विडंबन कविता वाचताना हे विशेषच जाणवते. या कवयित्रींनी विडंबनकाव्य लिहिण्याची प्रेरणा केशवकुमारांच्या 'झेंडूची फुलें' (१९२५) पासून घेतली आहे. सुशीला बापट, सुशीला मराठे, अर्पणा देशपांडे, मीना दीक्षित आणि मधुवंती सप्रे यांनी विडंबनकाव्य लेखन केले आहे. स्त्रियांच्या काव्याचे जितके अधिक संशोधन होईल, तितकी ही यादी कदाचित वाढेलही!

अपर्णा देशपांडे यांच्या 'पर्णकुटी' (१९४६) या काव्यसंग्रहातील काही विडंबने उल्लेखनीय आहेत. कवी गिरीशांच्या 'शनवारवाडा' या कवितेचे विडंबन 'एका छिन्नविच्छिन्न हुतात्म्यास पाहून' या कवितेत केले आहे. मूळ कवितेच्या वृत्ताचा घाट कायम ठेवून हे विडंबन केले आहे. मूळचे काही शब्द कायम राखल्यामुळेही विडंबनाची खुमारी वाढली आहे. एका मत्कुणाला (ढेकुणाला) हुतात्मा मानून हळहळ व्यक्त करणारा येथील सूर उदात्त विषयाच्या जागी क्षुद्राची प्रतिष्ठापना झाल्यामुळे हसू आणतो. ''सळो किंवा पळो केले प्रत्यहीं त्वां रिपूलागीं'' (पृ. ४४) ही ओळच याची प्रचीती देईल.

मायदेवांच्या 'आता बाई नोकरि घरिं लागली' या कवितेचे विडंबन कवयित्रीने त्याच चालीवरील कवितेत साधले आहे. नवऱ्याने पेन्शन घेतल्यामुळे जिच्या दिवसभराच्या स्वातंत्र्यावर गदा आली आहे, अशी वैतागलेली पत्नी त्यांनी सहज साकारली आहे. ती अशी :

*सारखि चाले अवराआवर । पडूं देति ना मज घटकाभर*
*कोंठारावर करडी नजर । भाजि म्हणति नासली ॥* (पृ. १९)

यशवंतांच्या 'गुलामाचें गाऱ्हाणें' या कवितेचे या संग्रहात 'मालकाचे गाऱ्हाणे' या कवितेत

विडंबन केले आहे. एका कजाग बायकोच्या पोक्त नवऱ्याचे हे गाऱ्हाणे वाचताना त्यात एका क्रांतिकारूपी भार्येचे दर्शनही वाचकांना घडते.

मीना दीक्षित विनोदविडंबनकार कवी चं. ग. दीक्षित यांची कन्या होत. यांच्या 'मीना' (१९५७) या संग्रहातील एकच विडंबनकविताही लक्ष वेधून घेते. 'पोस्टातील मुलगी' या चित्रपटातील 'तें माझें घर' या गाण्याचे त्यांनी विडंबन केले आहे. उदा.

*तीन खणांचे एक खुराडे,*
*रुपये पस्तिस त्याला भाडे,*
*जुनाट भिंती, गळकें छप्पर*

घराविषयीच्या स्वप्निल कल्पना व्यक्त करणाऱ्या त्या गाण्यातील 'रोमँटिक' वृत्तीचे येथे व्यावहारिक चित्र रेखाटून हसे केले आहे. स्त्रीसंबद्ध जीवनात घराविषयी विशेष आस्था असल्यामुळे यंत्रयुगीन सामाजिक परिस्थितीत स्त्रीचा होणारा स्वप्नभंग येथे विडंबनाच्या माध्यमातून नकळत प्रगट होतो.

सुशीला बापट यांच्या 'बोरे' (१९६०) या काव्यसंग्रहात मौजेसाठी लिहिलेल्या कविताविभागात काही विडंबने आढळतात. 'उषास्वप्न'कार ग. दि. माडगूळकरांची क्षमा मागून लिहिलेले 'निशास्वप्न' आहे. स्वप्नात दिसलेल्या चोरावर लिहिलेले ते काव्य गोड स्वप्नांची धुंदी पटकन उतरवते. त्यांच्या 'आधुनिक सावित्री', 'नव्या मनूंतील नवरा (दिवस रेशनिंगचे)' या कविता विशिष्ट कवितांची विडंबने नाहीत. तरीही त्यातून बदलत्या स्त्रीप्रतिमेची चाहूल लागते. पति-पत्नींमधील पारंपरिक भूमिकांना जाणारा छेद विडंबनाला जवळचा ठरतो. तो असा : "पाणी उपसून देण्यास्तव तें करद्वय कोमल राबविणे । पसंत नाही बिल्कुल माते, धिक् नवऱ्यांचे तशा, जिणें!" त्यांच्या 'मुली तू आलिस अपुल्या घरी' या लोकप्रिय गीताच्या विडंबनात धीट नववधूचे मनोगत प्रगट होते. ते असे :

*'सदनी पहिले पाउल पडता,*
*सासुबाईंची जाईल सत्ता...'* (पृ. ८३)

मूळ भावगीतातील हळवी, बावरलेली नववधू येथे कात टाकून आक्रमक रूपात समोर आल्यामुळे सहज विनोद घडतो. भा. रा. तांबे यांची 'कुणि कोडे माझे उकलिल का?' या कवितेच्या विडंबनात एका 'बिचाऱ्या' पतीची व्यथा सादर होते. गृहिणीची ही प्रतिमा पारंपरिक कोंदणात विसंगत असल्यामुळे विनोदनिर्मिती घडते. उदा.

*चिंता ढग 'मम' शिरीं डवरला*
*कडकडते 'तव' वदनीं चपला*
*वाणी-निर्झर 'तव' खळखळता*
*होई कसा मी सहज मुका?* (पृ. ९४)

सुशिला बापट यांची काव्यरचनेवर पकड चांगली असल्यामुळे मूळ कवितेचा बाज राखला जातो. त्यांनी 'नवकारकुनाची नवरामरक्षा' लिहून नित्य पठणातले धार्मिक काव्यही विडंबनासाठी निवडले आहे ते असे :

*उन्मत्त होता रावण । तया दाविलासी रामबाण*
*साहेबापुढे शूरपण । देई माते ।* (पृ. ७१)

अशी विनवणी करणारा हा नवकारकून म्हणजे बदलत्या सामाजिक परिस्थितीत दयनीय ठरलेल्या पुरुषवर्गाचा प्रतिनिधीच वाटू लागतो. त्यांची 'झुरळाचे भावगीत' सारखी कविता तर 'गोड गोड भावगीत' नावाने त्या काळात लोकप्रिय झालेल्या साचेबद्ध काव्यप्रकाराचेच जणू विडंबन वाटत राहते. सुशीला बापट यांच्या विडंबनांमध्ये नावीन्य आणि सहजता आढळते.

सुशीला मराठे या कवयित्रीचा तर 'क्षमस्व' (१९७२) नामक स्वतंत्र विडंबन काव्यसंग्रह प्रसिद्ध झालेला आहे. त्यांच्या 'मराठाचि बोल' (१९५१) या सुरुवातीच्या एका काव्यसंग्रहातही एक विडंवनकविता समाविष्ट आहे. 'आम्ही कोण' या विडंबनकवितेतील या ओळी मार्मिक आहेत :

*आम्ही कोण म्हणून काय पुसतां —?*
*विस्फारुनी नेत्र हे*
*नाहीं ठाउक कां तुम्हा अजुनिही —?*
*कॉलेजकन्या अम्ही!*
*जागा खास 'रिझर्वड्' रोज मिळते —*
*(दाक्षिण्य हें आपुलें!)*
*झाला हो जरिही विलंब लव ना*
*किंतू मनीं नेहमीं!* (पृ. ६५)

स्त्रीशिक्षणाच्या पहिल्या पर्वाविषयीच्या प्रतिक्रिया यात उमटलेल्या आहेत. स्त्रीशिक्षणामुळे अस्मिता जागी झालेली स्त्री यातून व्यक्त होतेच, शिवाय तत्कालीन समाजाने शिकणाऱ्या स्त्रीवर अवाजवी कुतूहलातून रोखलेले प्रश्नांचे बाण, या बाणेदार उत्तरातून सुचविलेही जातात!

'क्षमस्व'मध्ये ५५ विडंबनपर कविता आहेत. त्यात अभंग, आधुनिक कविता, गीते इ. अनेक प्रकारच्या रचनांची विडंबने आहेत. शेवटी 'पसायदाना' ऐवजी 'सायदान' आहे. तांबे यांच्या गाजलेल्या कवितेच्या विडंबनात एक स्त्री म्हणते :

*जन पळभर करतिल 'काव काव'*
*मी केला परजातीय विवाह* (पृ. ९)

बालकवींच्या 'औदुंबर'चे विडंबन त्याच्या जागी शहरी संस्कृतीचे प्रतीक 'निवडुंग' म्हणून केले जाते. त्यातून बदलत्या नैसर्गिक पर्यावरणावर नकळत भाष्य येते.

माधव जूलियनांच्या 'तेथें चल राणी' या हळव्या स्वप्नमग्न प्रणयी वृत्तीच्या कवितेचे विडंबन करताना त्या लिहितात :

*कोठें तरी जाऊं निघुनी 'जंबो'मधुनी, अज्ञात ठिकाणीं*
*ना रेशन-रांगा, न जिथें गर्दि दिवाणी*
*तेथें चल राणी* (पृ. २३)

या कवितेत वाहनाचा उल्लेख आल्यामुळे विडंबनाला खुमारी येते. मूळ कवितेतले जाणे

आभासमय पातळीवरचे (वाहनाशिवाय!) होते, हे एकप्रकारे उघडकीला येते. यात व्यवहारातल्या कटकटींचा स्पष्ट उल्लेख आल्यामुळे मूळ कवितेतला पवित्रा त्राग्याचाही वाटू लागतो!

मराठे यांची काही विडंबने बदलत्या संस्कृतीचा आशय घेऊन येतात. उदा. 'मम्मी' ही कविता यशवंतांच्या 'आई' या गाजलेल्या कवितेचे विडंबन आहे. खरे तर येथे बदललेल्या पोशाखी संस्कृतीचेच विडंबन केले आहे.

*आईऽ म्हणोनि बेबी घालूं नकोस साद*
*युगधर्म पाहुनिया बदलीत जाइ शब्द* (पृ. ३२)

ही सुरुवातच आकर्षक आहे. विशिष्ट शब्द आणि सांस्कृतिक परीघ यांतील नाते येथे अचूक टिपले आहे.

'किचन कम बेडरूम' ही कविता सामान्य मध्यमवर्गीयांच्या जीवनात छोट्या जागेमुळे पति-पत्नींच्या वाट्याला रोजच कशी 'स्वप्नांची समाप्ती' येते, हे खुमासदार शैलीत व्यक्त करते. कुसुमाग्रजांच्या मूळ कवितेत प्रियकराने हळुवारपणे घेतलेल्या प्रेयसीच्या निरोपाला येथे सकाळच्या दैनंदिन चाकोरीबद्ध तपशिलांची फोडणी मिळाल्यामुळे हास्यनिर्मिती सहजपणे घडते.

मायदेवांचा 'अतां तर नोकरि घरिं लागली' ही कविता विशेष लोकप्रिय असावी. मराठेबाईंनीही या कवितेचे विडंबन केले आहे. स्त्रीशिक्षणानंतर स्त्रीचे अर्थार्जन हा खरे तर सामाजिक संक्रमणाचा एक टप्पा होता. पण नोकरी म्हणजे नवी साडी, पर्स इ. उथळ कल्पनांभोवती एकेकाळी गुरफटणारे समाजमानस (त्यात स्त्रीही आलीच!) अशा कवितेतून लक्षात येते.

मधुवंती सप्रे यांचा 'हसले आधी कुणी' (१९९५) हा विडंबनकाव्यसंग्रह अलीकडचा आहे. त्यात त्यांनी कवितेआधी विडंबनामागची कल्पना स्पष्ट केली आहे. वास्तविक असे स्पष्टीकरण फार तर परिशिष्टात द्यायला हवे होते! त्यांनी विडंबनासाठी निवडलेल्या कविता विविध रचना प्रकारांतील आहेत.

*'उंबरठ्यावर माप ठेविले*
*मी हाताने उचलून आले*
*आले माझ्या घरी*
*करू रे दोघेजण चाकरी!* (पृ. ३८)

असे ठणकावून सांगणारी यातील नववधू, मूळ गीतातील समर्पणभावनेला छेद देऊन लक्ष वेधून घेते. त्यांच्या 'रेल्वे आणि बायका' या कवितेत पारंपरिक भोंडल्याचे गाणे आणि डेलीपॅसिंजर स्त्रीचे मनोगत यांचा गंमतीदार मेळ साधला गेला आहे.

या संग्रहात सामाजिक, राजकीय विषयही समाविष्ट आहेत. उदा. 'नाच रे घुम्या' (तिकिटासाठी खटपटी करणारा नेता), 'पाऊस (भ्रष्टाचाराचा)', 'एन्रॉन', 'हर्षदची आरती, शेअर घोटाळा प्रकरणावरील 'दिवस तुझे हे गिळायाचे' इ. कविता, तसेच बाबरी मशीद

पाडण्याच्या घटनेवरील कवितेत जुन्या गाण्याचा घाट पूरक ठरतो. तो असा :

वावरीची पडता भिंत
*बॉम्बस्फोट होई*
*देवळात थांबलेला*
*राम निघून जाई* (पृ. १४)

'कबिराचे विणतो शेले'च्या चालीतील हे गीत ह्या घटनेवर एकप्रकारे भाष्य करते. त्यांच्या विडंबनांमध्ये अशा काही चमकदार कल्पना आहेत. पण रचना खडबडीत आहेत. कवयित्रीने कलात्मकतेकडे दुर्लक्ष केले आहे.

एकंदरीत विचार करता स्त्रियांच्या या सर्वच विडंवनकविता प्रथम दर्जाच्या असल्याचा दावा कोणीच करणार नाही. त्यात काही प्रमाणात अनुकरण आहे, हौस आहे, एखाद्या कवितेचा तयार तर्जुमा वापरण्याची क्लृप्तीही आहे. हे सारे काही बाबतीत खरे असले तरीही त्यात अनेक ठिकाणी समकालीन जीवनातील बदल व त्यांना अनुरूप असे संदर्भ टिपण्याची स्वतंत्र दृष्टीही आहे. विनोद ही एक कलादृष्टी असते. तशीच एक जीवनदृष्टीही असते. ही विडंबने या दोन्ही दृष्टीने महत्त्वाची आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळापासून आजपर्यंतच्या वाटचालीत स्त्रीशिक्षण, स्त्रीचे अर्थार्जन, आंतरजातीय विवाह, स्त्री-पुरुष समता इत्यादी बदल संथ गतीने येत गेले आहेत. त्यांच्या पाऊलखुणा त्या स्त्रियांना जाणवल्या. त्यांच्यावर विनोदाच्या अवगुंठनातून काही एक भाष्य केले. कधी स्त्रीची वदलती प्रतिमा हास्यविषय ठरवावीशी वाटली, कधी पुरुषाची बदलती प्रतिमा (पतिपदाचा दरारा गेलेली प्रतिमा) हास्यविषय करावीशी वाटली! त्यांच्या लेखी जणू स्त्री आणि पुरुष यांच्या नात्याचा समतोल हे स्वप्नवत चित्र होते तर! त्यामुळे सीसॉसारखे, स्त्रीचे पारडे जड झाल्यावर पुरुषाचे पारडे केविलवाणे होणे अटळ ठरले! विनोदासाठी चित्रण ठसठशीतच असावे लागते; त्यामुळेही या प्रतिमांचे कधी सोप्या पद्धतीने स्थलांतर झाले! तरीही पति-पत्नी या नात्याचा बदलता पोत त्यातून नकळत व्यक्त होतो आणि तो महत्त्वाचा आहे. या कवितांमध्ये काही वेळा स्त्रीच्या सामाजिक जीवनातील अनुभवांविषयी खासगी सुरातील भाष्य येते. काळाचा संदर्भ लक्षात घेता ते समजून घ्यावे लागते.

या कवयित्रींनी विडंबनाच्या निमित्ताने लोकप्रिय कवितांकडे आणि स्वत:च्या अनुभवांकडे पाहण्याची एक सूक्ष्म, मिस्किल, धीट दृष्टी व्यक्त केली आहे, हे विशेष महत्त्वाचे आहे. खरे तर 'काही स्त्रियांनी देखील विडंबन कविता लिहिल्या आहेत' अशी एका ओळीत नोंद करण्याजोगी जागा (स्त्रीदाक्षिण्य म्हणून नव्हे!) त्यांच्यासाठी वाङ्मयाच्या इतिहासात राखून ठेवायला हरकत नव्हती!

■

- डॉ. नीलिमा गुंडी
३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे ४११ ००२.

# कविता घडते अशी



डॉ. कल्याण इनामदार



मराठी भाषा आणि तिचे शब्दवैभव म्हणजे मराठी बोलीचा वारसा मिरवणाऱ्या जनसमूहाला आणि सारस्वतांना एक लाघवी वरदानच गवसल्यासारखे आहे. भाषेची मायमाऊली म्हणून ओळखल्या जाणाऱ्या संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरांनी मराठी शब्दांचा 'नादाची रुपडी' असा यथोचित गौरवही केला आहे. हा नाद-लयीचा प्रत्यय मराठीच्या सर्वच वाङ्मय प्रकारांतून रसिकांना सातत्याने मिळत असतो. कविता हा वाङ्मयप्रकार तर या स्वरलालित्याची उन्मनी अवस्था सिद्ध करणारी भावनिर्मितीच आहे. कवितेतून गोचर होणारा स्वरसिद्धांत कवीच्या शब्दांतून भावानुभवाची समृद्ध शीळचं मुखर करताना दिसतो. कवितेविषयी जिव्हाळा वाटतो, तो यामुळेच.

कवितेच्या निर्मितीचा शोध आणि प्रकटीकरणाचे कुतुहल म्हणजे मानवी मनाला व्यापून राहणारे एक गूढच आहे. कवीच्या मन:चक्षूंना, भाववृत्तीला जे जे दिसते, जाणवते आणि हेलावून सोडते त्याचा प्रत्ययकारी हुंकारच त्याच्या कवितेतून उमटत असतो. लौकिक पातळीवर वावरताना कधीकाळी विशिष्ट भावानुभव त्याच्या खास लकबीसह मनात संक्रांत झालेले असतात. अशा काही भावानुभवाशी जेव्हा कवीच्या भाववृत्तीचा जाणीव-नेणिवेच्या द्वंद्वात्मक अवस्थेत संवाद सुरू होतो आणि शब्द आपोआप सापडू लागतात, तेव्हा हळूहळू कविता बोलकी होते, कागदावर उतरते. भावानुभूतीशी संवाद साधणारे शब्द-लाघव मनात रुंजी घालू लागल्यापासून सुरू झालेला कवितेचा प्रवास हवा तसा आणि हव्या त्या भावसामर्थ्याने टिपला जाईपर्यंत थांबत नाही. शब्दांची लय सापडलेला आशयाभिव्यक्तीचा आविष्कार हा कवितेला पूर्णत्व येईपर्यंत सुरूच राहतो. फुलांचे फुलणे जसे आल्हादकारक आणि चेतोहारी असते, तसाच कवितेचा आविष्कारही.

काव्यनिर्मितीच्या वेळी कवीच्या मनातील भाव-भावनांचा ढवळून निघालेला तळ आणि कवितेनंतर जाणवणारा मोकळेपणा कवीला खूप अप्रूप वाटतो. आनंद आणि समाधान देणारी मनस्वी कविता जगण्याचे एक अंगच होऊन बसते. पक्षी सैलसर तारांवर बसून स्वच्छंदपणे झुलतात, वेगळे आभाळ अनुभवतात तसाच स्वच्छंद आणि तृप्त अनुभव पुष्ट कवितेच्या निर्मात्याला येत असतो.

'कविता' हा जसा आत्मशोध तसाच द्विजात्मक अनुभवही आहे. अनुभव घेणे आणि अनुभव व्यक्त करणे, ह्या दोन बाबी निर्मितिप्रक्रियेत महत्त्वाच्या आहेत. म्हणजे कवीच्या मानसरूपात अनुभव एकदा अवतरत असतो, तर दुसऱ्यांदा तो त्याच्या मानसविश्वातून शब्दांवाटे प्रकट होत असतो. या द्विजात्मक अनुभवक्रियेमुळेच कवितेला 'ए पोएम ट्वाइस बॉर्न' असे म्हटले जाते.

निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताई या चार भावंडाच्या नावाला परमार्थाचे निरूपण करताना चार

पारमार्थिक अवस्था म्हटले जाते. काव्यनिर्मितीच्या बाबतीतही अशाच चार अवस्थांचा क्रमशः विचार मांडणे, अधिक सयुक्तिक वाटते, ते असे :

१. कवीला येणाऱ्या कोणत्याही अनुभूतीचे त्याने तटस्थपणे रूप न्याहाळणे म्हणजे 'निवृत्ती'.

२. न्याहाळलेल्या अनुभूतीच्या संपूर्ण रूपाचे त्याला यथार्थ दर्शन घडणे म्हणजे 'ज्ञान'.

३. ज्ञान प्राप्त होऊन घडलेल्या दर्शनाला व्यक्त रूप देण्यासाठी विविध अवस्थातून जावे लागते. या पायऱ्या म्हणजे 'सोपान'.

४. या भावानुभूतीला सर्व अवस्थांतून गेल्यानंतर लावण्यरूप लाभते आणि विशिष्टतेचे कवच लाभलेला अनुभव साधारणीकरणाच्या पातळीवर गेल्यामुळे 'मुक्त' होतो.

या चारही अवस्थांचे समग्र दर्शन घडवणाऱ्या कवीच्या भावानुभवाचे व्यक्त रूप रसिकांच्या अनुभवविश्वाचा भाग होऊन जाते व त्याची अनुभव-संघटनाच बदलते.

उदा : 'ठेविले अनंते तैसेची रहावे ।

चित्ती असो द्यावे, समाधान' ॥

हा तुकारामाचा अनुभव काव्यरूपाने प्रकट होताच सर्व रसिकांच्या भावानुभवाशीही तादात्म्य साधतो, म्हणजेच साधारणीकरणाच्या पातळीवर येतो आणि भावानुभूतीची अनुभव-संघटना एकट्या तुकारामाची न राहता व्यक्तिनिष्ठ अनुभवातून मुक्त होऊन वैश्विक होते.

काव्यनिर्मितीही अशाच अवस्थांतून कार्यान्वित होत असल्यामुळे त्याची अशी मांडणी करता येते.

कवीच्या प्रकृतीधर्मानुसार तो त्याच्या आत्मप्रत्ययाचा स्पंदनक्षण शब्दात धरत असतो. कधी अजाणता, कधी जाणीवपूर्वक, तर कधी जाणीव-नेणिवेच्या द्वंद्वात्मक अवस्थेत कविता साकारत असते. निर्मितीच्या क्षणी कवीला शब्दांशी चाळा करावा लागत नाही. त्याच्या स्मृतीची जागृतावस्था व अंतर्मनाचा समतोल ताण संवादी-विसंवादी शब्दांची वीण घट्ट करीत आपोआपच काव्यरूप धारण करतो. सौंदर्याने भारावून गेलेल्या कविमनाला जे जाणवले ते व्यक्त होताना त्याच्या जीवनदृष्टीचे आणि चिंतनशील मनोभूमीचे दर्शनही शब्दरूपाने अवतरत असते आणि जीवनातील विविध अनुभवांना शब्दांतून गोचरत्व देण्यात कवीला विलक्षण आनंद होत असतो. काही क्षणापुरती तरी काव्यनिर्मिती ही कवीच्या दृष्टीने आनंदपर्वच असते.

कवीच्या मुशीतून जन्मलेल्या सकस, समाजाभिमुख, विचारगर्भ आणि प्रतिभासंपन्न कवितेमुळे मराठीच्या विकासात, वैभवात देदिप्यमान भर पडून तिच्या कक्षाही रुंदावल्या आहेत.

■

डॉ. कल्याण इनामदार, एम. ए. पीएच. डी.
३९/२/२ 'अर्चना' सी-२७, एरंडवणे, पुणे ४११ ०३८.
दूरध्वनी : ५४४३५५५



अनुक्रमणिका

# हा तो साहित्यकुसुमांचा आस्वादु

## एक वैशिष्ट्यपूर्ण आत्मचरित्र : 'वळचणीचे पाणी'

❑

श्री. दा. गो. देशपांडे

❑

*('वळचणीचे पाणी' : ले. बाळ गाडगीळ, प्रकाशक : पुष्पक प्रकाशन, ३८१ अ-१, शनिवार पेठ, कन्याशाळेजवळ, पुणे ४११ ०३०. पृष्ठे ३८४ डेमी, मूल्य ३०० रुपये.)*

**स्व**त:चा निश्चित असा वाचकवर्ग निर्माण करणारे प्रा. बाळ गाडगीळ यांचे 'वळचणीचे पाणी' हे आत्मनिवेदन अनेक दृष्टीने व पैलूने आगळेवेगळे ठरावे, असे वैशिष्टपूर्ण आहे. स्वत:चा वाचकवर्ग, संपादक आणि प्रकाशक सिद्ध करणारे आणि असणारे लेखक अल्पसंख्य आहेत आणि गाडगीळ त्यात अग्रक्रमी आहेत. आणखी एक लक्षणीय अंग म्हणजे गाडगीळ हे सातत्याने लेखन करणारे असून, जसे बहुप्रसव नाहीत, तसेच 'लेख पाडणारे' नाहीत. या पार्श्वभूमीवर त्यांचे आत्मनिवेदन औत्सुक्य आणि कुतूहलाने जाणून घ्यावे असे वाटणारे त्यांचे जे असंख्य चाहते आहेत, ते त्यांचे सोत्साह स्वागतच करतील, याबद्दल शंका घेण्याचे कारण नाही.

या पुस्तकाचे लगेच मनावर ठसणारे असे मुखपृष्ठ होय. ते अतिशय लक्षणीय आहे. काही वर्षांपूर्वी कै. ना. सी. फडके यांनी 'व्यासपीठावरील तीन भयंकर प्राणी' (प्रास्ताविक करणारा, परिचय करून देणारा आणि अध्यक्ष) शीर्षकाचा मार्मिक लेख लिहिला होता. बऱ्याच पुस्तकांच्या बाबतीत त्यांचे तीन शत्रू असतात. एक, त्यांचे आकर्षक व खपावर (किंवा विक्रीवर) नजर ठेवून पुस्तकाच्या आशयाशी फारसा संबंध नसलेले कव्हर, दोन, त्याची प्रस्तावना आणि तीन, लेखकाचा परिचय. वास्तविक पुस्तक हेच त्याच्या ओळखीचे दस्तावेज असते. प्रस्तावना रसिक वाचकास वाकुल्याच दाखवते आणि त्याच्या स्वत:स रसग्रहणास बऱ्याच वेळा बाधित करते. गाडगीळांच्या पुस्तकात या तिन्हींचे 'प्रताप' आहेत. मुखपृष्ठावरचे चित्र पुस्तकाच्या आशयाचा जो गाभा व मर्म आहे, त्याच्याशी विलक्षण आत्मीयतेने संवादी अणि अन्वर्थक आहे. एक लहानगे बालक आपल्या आईचा हात धरून वाटचाल करत असल्याचे हे चित्र आहे. आई जुन्या पिढीतली, बाळबोध वळणाची व तशाच पोषाखातील वात्सल्याची आरपार मूर्ती वाटावी अशी. म्हणूनच हे पुस्तक अगदी प्रथमदर्शी वाचकाला भावून जाते.

या आत्मनिवेदनाचे शेवटून दुसरे प्रकरण जे आहे, ते 'आईची गोष्ट' आहे. खरं पाहिलं तर हे निवेदन गाडगीळांच्या अस्मितेचे उत्थान जे झाले, त्याचे प्रेरणास्रोत आहे. या दृष्टीने पुस्तकाचा आरंभच मुळी ह्या प्रकरणापासून व्हावयास हवा होता, असे वाटल्यावाचून राहिले

नाही. गाडगीळांना आपल्या मातोश्रींचे जे उदंड संजीवक असे वात्सल्य लाभले, तो त्यांच्या आयुष्याचा अतूट असा ऋणानुबंध सदोदित तारक ठरत गेला. एक स्त्री जेव्हा आई बनते, तेव्हा ती झोपेतही जागी असते. कारण एक जीव तिला नुसता जगवायचा नसतो, तर तो वाढवायचा असतो. गाडगीळांची आई अर्थबळ नसताना आपल्या मुलांना पुण्याला घेऊन आली, ती त्यांना वाढवण्याच्या ऊर्मीने आणि ते तिने जिद्दीने केले. त्याची जाण व भान गाडगीळांना सजीव व सचेत करून राहिली. बऱ्याच वर्षांपूर्वी विठ्ठल संप्रदायाचे सार कथन करताना कवी बेंद्रे म्हणाले होते, ''आई-बापात देव पाहणे आणि देवात आई-बाप पाहणे हेच त्याचे 'सार' होय.'' गाडगीळांची धारणा आणि भावना या प्रतीची जी आहे, ती ह्या पुस्तकात उत्कटतेने हृदयस्पर्शी आहे. तिची उंची आणि खोली जी आहे, ती हे पुस्तक मुळात वाचल्याशिवाय प्रत्ययास येणार नाही.

आज बाळ गाडगीळ हे देश-विदेशात विख्यात झालेल्या बहुआयामी शिक्षणसंस्था 'सिम्बियोसिस'चे उपाध्यक्ष आहेत. त्यापूर्वी ते पुणे विश्वविद्यालयाचे प्र कुलगुरू होते. त्यापूर्वी फर्ग्युसन विद्यालयाचे ते रँग्लर परांजपे, रँग्लर महाजनी आणि डॉ. डी. डी. कर्वे या महान प्राचार्य होऊन गेलेल्या सुप्रसिद्ध शिक्षणसंस्थेचे एका दशकापेक्षा अधिक काळ त्यांच्याच योग्यतेचे, क्षमतेचे आणि कर्तृत्वाचे प्राचार्य म्हणून कारकीर्द गाजवून राहिले. गाडगीळ या प्रतिष्ठित पदावर येण्याच्या अगोदर अखिल भारतीय प्रशासकीय प्रतिस्पर्धेत यशस्वी होऊन आयकर खात्यातले आय. ए. एस. अधिकारी होते. अशा पदावर गेलेला माणूस त्याच श्रेणीत चढत चढत जातो आणि मर्यादित वर्तुळात आपला अहंकार कुरवाळत आणि वाढवत फसत जातो आणि त्याच अवस्थेत निवृत्त होतो. तथापि गाडगीळांनी हे पद स्वेच्छया सोडले आणि आपल्या आवडत्या अध्यापन आणि अध्ययन क्षेत्रात आले. हेच एक असाधारण नैतिक बांधिलकीचे लक्षण होय. तसे पाहिले तर गाडगीळांना आपली शिक्षणाची वाटचाल क्रमताना उपजीविका आणि शिक्षण, कुटुंब आणि आवड हे सारख्याच कौशल्याने सांभाळण्याकरता एकापेक्षा जास्त नोकऱ्या कराव्या लागल्या. संघर्ष करावा लागला. ते रेसकोर्सवरही नोकरी करत. हा सारा त्यांच्या जगण्या-जगवण्याचा प्रवास ह्या त्यांच्या पुस्तकात नितळपणे आलेला आहे. तो जितका प्रांजल आहे, तितकाच अस्वस्थ करणारा आहे.

गाडगीळांसारखे आयुष्य ज्यांच्या वाट्याला येते आणि खडतर आयुष्यातून मनुष्य जेव्हा ते अडसर स्वत:च्या पुरुषार्थाने पार करत एकापेक्षा अधिक हेवा वाटावा, असे टप्पे ओलांडून 'मोठा' होतो, तेव्हा बऱ्याच वेळा असं दिसतं की, आत्मगत आविष्कारात प्रौढी मिरवण्याची आणि फुशारकी मारण्याची वृत्ती आत्मप्रसिद्धीला वश होते. गाडगीळांचा विशेष असा की, ते अशा मोहाला मुळीच बळी पडले नाहीत. उलट विनय, सौजन्य आणि कृतज्ञता हा त्यांचा स्थायीभाव असल्याचे शब्दाशब्दांतून चित्ताला चटका लावून जाते. याची दोन कारणे आहेत. एक असे की, प्रत्येक माणसात सामान्य आणि असामान्य, लौकिक आणि अलौकिक असे गुण असतात. ज्याला हे कळतं व जो जागा राहतो, तो असामान्य आणि अलौकिक असं स्वत:त जे आहे, त्याचा गुणाकार करतो आणि त्याच्या हातून मोठी कामे होतात. गाडगीळांचे

जीवन याचा प्रेरणादायी दस्तऐवजच आहे. गाडगीळांनी आपलं सामान्यपण जपलं. कारण ते 'मानवी' असतं, हे त्यांना मनोमनी पटलेलं होतं. असं करताना त्यांनी आपलं असामान्यपण सहजतेनं फुलारेल अशी विचार'शीलता' आणि आचरण'शीलता' यांचा सुरेख मेळ साधत लौकिकाच्या मागे धावत स्वत:च फसणं आणि हरवणं यापासून स्वत:ला वाचवलं. हे त्यांचं अलौकिकत्व होय. यात अनाठायी अहंकाराच्या दर्पापासून दुर्मिळ अशा मनस्वी सजगतेनं ते आचरत विचरत राहिले. मध्यमवर्गीयांचे जे गुण असतात, तेवढेच त्यांनी जवळ केले आणि तथाकथित उच्चभ्रूपणाच्या अतीव चातुर्य आणि चारुत्वाने गेले. ही प्रक्रिया वर्तमान आहे, हे आणखीन मनावर ठसावे, असे सत्त्व व स्वत्व. हे सर्व पुस्तकाच्या चौदा प्रकरणांतून नदीच्या सूक्ष्म प्रवाहाप्रमाणे कलाकलाने कसे विशाल होत गेले, याचा फार हृदयंगम आलेख उमटला आहे. अगदी पहिले प्रकरण 'लहानपण देगा देवा' पासून ते 'आईची गोष्ट' व 'माझ्याविषयी' पर्यंत पुस्तक खाली ठेववत नाही ते पुस्तकातील या अंगभूत मनुष्याच्या (गाडगीळांच्या) विकासानुगामी व उर्ध्वगामी विलासामुळे. शिक्षणातले प्राविण्य, उपजीविकेचा प्रयास, सरकारी वरिष्ठ पदावर नेणारी शिडी आवडते काम करण्याच्या उर्मीमुळे फेकून देण्याचे नैतिक धैर्य आणि आवडीचे काम मिळाल्यावर त्यात स्वत:ला पूर्णपणे झोकून कर्म करत राहण्याची अविरत तळमळ आणि तत्त्वाशी तडजोड न करता अंगिकारलेले व्यवहारीपण असा विलक्षण संगम त्यांच्या जीवनयात्रेच्या कथनातून जो व्यक्त झाला आहे, त्याला मराठीत तोड व जोड नाही, असे म्हटल्यास ते अतिशयोक्तीचे ठरू नये.

या समीक्षणावरून असं कुणाला वाटू नये की, गाडगीळांचा संस्थात्मक सारा प्रवास 'गुडी गुडी' असा सपक झाला. तसं मुळीच नाही. फर्ग्युसन कॉलेजचे प्राचार्य, प्र कुलगुरू, पुणे विद्यापीठ, ज्ञानपीठाचे निवड समितीचे सभासद इ. बरेच प्रिय-अप्रिय वर्तत गेले. ज्यांना गाडगीळांनी उठाव दिला, त्यांनी कृतघ्न होणे, पुणे विद्यापीठात स्वत:च्या वैयक्तिक स्वार्थापोटी भिडे नावाच्या प्रतिष्ठित (?) माणसाने त्यांना विनाकारण ताप देणे, ज्ञानपीठ समितीने मराठीच्या बाबतीतले विवाद्य धोरण व निर्णय इ. अप्रियता झेलत गाडगीळ ठाम राहिले. बाणेदारपणाने उक्ति-कृती ठेवली. परंतु गाडगीळांनी या सर्व संबंधांत वैयक्तिक कटुता आणि वैर यांपासून स्वत:ला मुक्त ठेवले. कारण त्यांच्यात एक शालीन तटस्थताही आहे. हे फार कमी असतं आणि ते गाडगीळात आहे. एवढेच नव्हे, तर दुसऱ्याला श्रेय देण्याची उदारता जशी आहे, तसेच त्यांच्याबद्दल कुणी काही नुसतं शब्दानं केलं तरी त्यांच्यात कृतज्ञता आहे. गाडगीळ माझ्या दृष्टीने अलौकिकाची कास धरणारे जे वाटतात, ते यामुळे.

गाडगीळांनी सगे-सोयरे व मित्र परिवारावर अतिशय शुद्ध अंत:करणाने आणि ममत्वाने जे लिहिले, ते विसरता येणार नाही इतके अनुपम आहे. गाडगीळांनी स्वत:च्या लेखनाविषयी एका प्रकरणात लिहिले आहे, त्यातही विनम्रता आहे. तथापि गाडगीळांचे विनोदी लेखन जे आहे, तसे पूर्वी कुणी लिहिले नाही आणि पुढे कुणी लिहू शकणार नाही. त्यांचा विनोद हा त्यांच्या जातिवंत मानवीपणा व रसिकतेचा परिपाक आहे. काही वर्षांपूर्वी मी त्या अनुषंगाने म्हटले होते की, त्याचा विनोद दंतविहीन बालकाच्या चाव्याप्रमाणे आहे. त्याचा सौम्यव्रण

उमटतो, पण रक्तबंबाळ करत नाही. याचा पडताळा त्यांच्या वागण्या-बोलण्यातूनही येतो. या पुस्तकावर पुष्कळच लिहावे वाटते. काय लिहू आणि काय लिहू नये, असे वाटावयास लावणारे हे अद्वितीय आत्मकथन आहे. त्यांच्यात भावभावना, परखडपणा आणि निर्भीडता यांचा मनोरम प्रपंच आहे. गाडगीळांना जे वाटते, ते स्पष्टपणे प्रकट करण्याचा त्यांचा पिंड या पुस्तकातून अभिव्यक्त झाला आहे. तो अतिशय अर्थवाही, आवश्यक तेथे सूचकतेने आणि आरपार पारदर्शकतेने आला आहे. मराठीचे हे पुस्तक म्हणजे एक लेणे आहे! 'पुष्पक प्रकाशन'ने फार प्रशंसनीय पुस्तक मराठी वाचकांना दिले!

■

श्री. दा. गो. देशपांडे
२/६, प्रीतमनगर, कर्वे पथ, कोथरूड, पुणे ४११ ०२९. दूरध्वनी : ५४६१९०८

---

## स्वागत

- **शास्त्रशुद्ध व्यायाम** : के. पी. भागवत
- **आई-बाप आणि मुले** : के. पी. भागवत
- **व्यायाम विज्ञान** : के. पी. भागवत
- **विचित्र वाटचाल** : के. पी. भागवत
- **प्राचार्य कमला भावे** : वामन वि. भावे, प्रकाशक - वामन वि. भावे
- **सील होणार मी सील होणार** : मंदाकिनी गोगटे, त्रिदल प्रकाशन, पुणे.
- **एक क्रांतीचा सूर्य — बबनराव जाधव** : सौ. वैजयंती पेठकर, प्रकाशक - सौ. वैजयंती पेठकर
- **हाताची घडी तोंडावर बोट** : माधव कोंडविलकर, देशमुख आणि कंपनी प्रा. लि., पुणे.
- **औदुंबर** : डॉ. कमलेश, संदर्भ प्रकाशन, पुणे.
- **आता उजाडले** : माधव कोंडविलकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई
- **ज्ञानेश्वरी** : छमन परसराम हर्दवाणी, प्रकाशक - छमन परसराम हर्दवाणी.
- **माहिया** : घन:श्याम धेंडे, वसुंधरा प्रकाशन, मुंबई.
- **अंधार उजळला** : ग. का. रावते, समर्थ प्रकाशन, मुंबई.
- **विळखा** : तानाजी वि. गायकवाड, तेजश्री प्रकाशन, पुणे.
- **ब्लॉक कॉमेडी** : सतीश साळुंके, जनप्रबोधन प्रकाशन, पुणे.
- **गंमत झाली भारी** : संगीता बर्वे, ज्योत्स्ना प्रकाशन, पुणे.
- **माझ्या मनातलं सांगू** : संगीता बर्वे, मराठी बाल साहित्य निर्मिती व प्रसार, पुणे.
- **आकाशपुष्प** : विजया द. जोशी, आशिष प्रकाशन, पुणे.
- **मृत्यूपत्र** : अरुण रा. गोडबोले, प्रकाशक - अरुण रा. गोडबोले, सातारा.
- **अंतर्कळा** : अरुण रा. गोडबोले, प्रकाशक - अरुण रा. गोडबोले, सातारा.
- **मातोश्री** : पुस्तकाची एक भेट प्रत ग्रंथालयासाठी मिळाली.

---



अनुक्रमणिका

# बेगम समरू : एक महाकाव्यसम कादंबरी

लेखक: प्रा. रंगनाथ तिवारी

❑

*प्रा. स. रा. गाडगीळ*

❑

*(बेगम समरू : लेखक प्रा. रंगनाथ तिवारी, प्रकाशक : बाबा भांड, साकेत प्रकाशन, ११५, महात्मा गांधीनगर, स्टेशन रोड, औरंगाबाद ४३१ ००५. पृष्ठे ५७५, मूल्य रु. ३००/-)*

इतिहासामध्ये सर्वमान्य युगपुरुष म्हणून मान्यता पावलेल्या नायक-नायिकांच्या जीवनावर एखादी कादंबरी अथवा नाटक लिहिल्यास तो ऐतिहासिक कादंबरी-नाटकाचा प्रस्थपित आदर्श मानला जातो. राजा शिवाजी, थोरले माधवराव, संभाजीराजे, पहिला बाजीराव या वीर पुरुषांच्या जीवनांवर आधारित नाटक-कादंबरी सर्वमान्य होते. पण प्रा. तिवारींनी हा रुळलेला मार्ग सोडून स्वत:च्या हयातीतच आख्यायिका (लीजन्ड-मिथ) बनलेल्या, पण समकालीनांनीच गौरवाबरोबर चारित्र्यहीन, धूर्त, अविश्वासार्ह, क्रूर, स्वार्थी ठरविलेली बेगम समरू आपल्या कादंबरीची नायिका म्हणून निवडली, हीच एक महत्त्वाची घटना आहे. या कादंबरीचा आवाकाच एवढा विशाल तसाच भव्य आहे की सहज करमणूक म्हणून साहित्याकडे पाहणाऱ्या वाचकाच्या कवेत बेगमचा हा बहुरंगी पट मावणारच नाही. उत्कट प्रेम, असूया, असूयेतून येणारी संशयी वृत्ती, कौर्य, द्वेष, सर्वस्वार्पण भाववृत्ती, उदात्त प्रेमासाठी मृत्यूलाही सामोरे जाण्याची सिद्धता, कोठे कथ्यक तर कोठे वासनेचे तांडव अशा विविध उत्कट भाववृत्तींनी गुंफलेले हे एक महाकाव्यच आहे. या सर्व भाववृत्ती समधात होऊन (कॅथार्सिस) निर्वेदातून व्यक्त झालेल्या शांत रसाने या महाकाव्योपम कादंबरीचा भव्योदात्त शेवट करण्याचा लेखकाने अतिशय काव्यात्म शैलीत प्रयत्न केला आहे. पण या सर्व भाववृत्तींचे उत्कट, उग्र दर्शन ज्या नायिकेच्या — बेगम समरूच्या व्यक्तिमत्त्वात होते, त्या नायिकेने तिवारींचा शांत रसात्मक तत्त्वविचार सन्मानाने बाजूला सारून करुणरसाचे शोकात्म नाट्याचे भव्योदात्त दर्शन घडविले आहे.

ही महान कादंबरी मुख्यत: बेगम समरू, तिच्यावर सर्वस्वार्पणवृत्तीने उत्कट प्रेमाचा वर्षाव करणारा तिचा सेनापती (जनरल) थॉमस जॉर्ज आणि जॉर्जला सेनापतीपद सोडावे लागल्यानंतर बेगमचा सेनापती झालेला, फ्रेंच सरदार घराण्यातून आलेला लिस्सू या तिघांच्या — प्रामुख्याने बेगम आणि जॉर्ज — यांच्या भावविश्वातून साकार झाली आहे हे खरे; पण हे फारच त्रोटक विधान आहे. एका दासीची स्वरूपसुंदर मुलगी - दिल्लीच्या चांदणी चौकात नाच-गाण्याच्या आणि आपल्या सौंदर्याच्या प्रभावावर पैसे मिळविणारी दहा वर्षांची पोर अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात संपूर्ण उत्तर भारतात आपल्या कर्तृत्वाने 'हर हायनेस बेगम समरू ऑफ सरधाना' या पदावर आरूढ झाली. — आपल्या हयातीतच 'आख्यायिका' (लीजंड-मिथकथा) बनली.



अनुक्रमणिका

युद्धशास्त्र, अश्वविद्या, तोफा-बंदुका ओतण्याच्या शस्त्रनिर्मिती शास्त्रात पारंगत आणि घोड्यावर आरूढ होऊन आपल्या सैन्याचे नेतृत्व करणारी बेगम, दिल्लीच्या बादशाहाची कन्या मानली जाऊ लागली. दिल्लीच्या सत्तेचे अधिपती मानले गेलेले महादजी शिंदे बेगमला आपली बहीण मानत. अशा या बेगमवर उत्कट प्रेम करणारा जॉर्ज, या उभयतांची ही रोमहर्षक पण शोकात्म कथा हा या कादंबरीचा मध्यवर्ती विषय आहे. एखाद्या कुशल माळ्याने फुलझाडांची, लतावेलींची सुबक काटछाट करून सुंदर आकार दिलेला घाटदार असा हा बगीचा नव्हे. ही कादंबरी हे एक विराट स्वरूपाचे घनदाट असे महावन आहे. वीस वर्षांच्या प्रदीर्घ उद्योगाने, तपश्चर्येने प्रा. तिवारींनी हे अवाढव्य कथाविश्व निर्माण केले आहे. भारताच्या पाच हजार वर्षांच्या इतिहासात अठराव्या शतकातील कालखंड हा एक अपूर्व असा कालखंड आहे. शक-हूण यांच्यानंतर कित्येक शतकांनी आलेल्या इंग्रज-फ्रेंचांनी येथे अपूर्व असे नवयुग सुरू केले. पण हे नवयुग स्थिर होण्यापूर्वी देशात प्रचंड असे अराजक माजले. देशात एकमुखी अशी मध्यवर्ती सत्ताच राहिली नव्हती. कोणीही यावे आणि लुटालूट करावी, अत्याचार करावेत, प्रचंड संपत्ती घेऊन जावे; स्त्रिया पळवून न्याव्यात अशा घटना प्रत्यही घडत होत्या. क्रौर्य, विश्वासघात आणि अमानवीय भावनांचा जितका उघडा-नागडा उद्रेक या शतकात सापडतो, तसा दुसऱ्या कोणत्याही शतकात सापडणे कठीण आहे. गुलाम कादरने बादशहा शहा आलम याचे डोळेच काढले. बेगमचा सावत्र मुलगा जाफर यावखान याच्या क्रौर्याला तर मर्यादाच राहिली नव्हती. क्रौर्यासाठी प्रसिद्ध असलेले रोहिले तसेच जाट, रजपूत, शीख आणि सर्वत्र लूटमार हा व्यवसायच करणारे ठग आणि पेंढारी या सर्वांनी उत्तर भारतात निर्माण केलेल्या अराजकाच्या पार्श्वभूमीवर बेगम, लिस्सू आणि महानायक थॉमस जॉर्ज यांच्या जीवनातील घटना घडतात. यामुळे या कादंबरीला बहुआयामी (multidimensional Novel) असे नाव देणे योग्य ठरेल.

महादजींनी जॉर्जला अप्पा खंडेराव यांच्यामार्फत बेगमकडे नोकरीसाठी पाठविले. पहिल्याच दिवशी त्याने तोफा ओतण्याच्या शास्त्रातील आपले ज्ञान आणि कौशल्य दाखवून बेगमसह सर्व अधिकाऱ्यांना चकित केले. पुढे एका युद्धात तोफगोळ्याच्या धोक्यातून जॉर्जने बेगमला आपल्या खांद्यावर टाकून युद्धभूमीपासून दूर नेऊन टाकले. पहिल्या भेटीतच तिला तो पूर्णपुरुष वाटला. दोघेही प्रेमपाशात गुंतले. जॉर्ज बेगमवर उत्कट प्रेम करतो. पण विवाहाशिवाय ती त्याला परकी वाटते. पण बेगमला विवाह वर्ज्य होता. तिला पतीसुख नाही, लग्न केल्यास तीन वर्षांनी पतीचे निधन होईल, असे एका सूफी संताने सांगितले होते; यामुळे ती लग्नाला तयार नव्हती. पण हे भविष्य ती जॉर्जला सांगत नव्हती. शिवाय जॉर्ज रोमन कॅथॉलिक असल्याने विवाहाशिवाय प्रेम, हे तो पाप मानत होता. कारण तो तिला परस्त्री मानतो.तीही त्याला आडवून ठेवू इच्छीत नव्हती.

जॉर्ज दुरावल्यानंतरही ती त्याचीच काळजी करत बसते. त्याचा जीव धोक्यात यावा, हे तिला मान्य होणे अशक्य होते. म्हणूनच ती लग्नाला मान्यता देत नाही. जॉर्जचे जीवन वादळात सापडले म्हणून ती मारियाचे जॉर्जशी लग्न व्हावे, अशी सूचना करते. मारिया ही सूचना मान्य

करते आणि जॉर्जलाही तयार करते. मग सर्व बाजूंनी कोंडी झालेली बेगम लिस्सूचे प्रेम स्वीकारते. शारीरिक मीलनाची ओढ ही नैसर्गिक आहे. या ओढीतून जग-विश्व फुलले आहे; यातूनच मानसिक, आत्मिक प्रेम फुलते. या प्रेमाची परिपूर्ती न झाल्याने जॉर्ज वेड्यासारखा झाला होता. वासनेची तृप्ती न झाल्याने बेगम वाघिणीसारखी क्रूर झाली होती. प्रेम - विशेषत: स्त्रीचे प्रेम जेव्हा नाकारले जाते, तेव्हा मानवाचा अमानव होतो. पुढे चर्चमध्ये जाऊन गुप्तपणे ती लिस्सूशी विवाह करते. नवे जीवन सुरू होते. नागरिक-सेना दोघेही बेगम आणि लिस्सू यांच्या विरोधात उठाव करतात. त्यांच्या हाती जिवंत पडू नये या हेतूने, बेगम लिस्सूला घोड्यावरून बाहेर पडावे असे परोपरीने सांगून पाहते; पण तो तिला एकटीला सोडून जाण्यास तयार नसतो. हे पाहून बेगम आपल्या हातातील कट्यार छातीत खुपसून घेते. रक्तबंबाळ होऊन ती कोसळते; पण कट्यार बरगडीवर अडकल्यामुळे ती जिवंत राहते. पण इकडे बेगम कोसळलेली पाहून लिस्सू आपल्या पिस्तुलाने मरण ओढून घेतो. नियतीचा हा करारच होता. बेगमचा सावत्र मुलगा (जाफरयाबखान) दोघांनाही तोफेला बांधून फरफटत नेतो. अनेकांकडून लिस्सूच्या मृतदेहाची आणि बेगमच्या देहाची विटंबना होते. याही प्रसंगातून सोडवून तिचे राज्य तिला परत मिळवून देण्यासाठी जॉर्जलाच यावे लागते.

जॉर्जगडच्या युद्धानंतर जॉर्ज विरक्त होतो आणि सर्वस्वाचा त्याग करून मातृभूमीला एकटा परत जायला निघतो. जॉर्जगड युद्धात घडलेल्या दुर्दैवी घटनांनी जॉर्ज नैराश्यग्रस्त झाला. भूतकाळातील भुतावळ त्याला स्वस्थ बसू देईना. नैराश्यातून विरक्ती निर्माण झाली. त्याच्या जीवनाची शोकात्मिकाच झाली. पण लेखकाने या त्याच्या मनोवस्थेला शांत रसाचे रूप देऊन त्याच्या संपूर्ण जीवनाला भव्योदात्त पातळीवर नेण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे.

खरे म्हणजे जॉर्जची ही शोकात्मिकाच आहे. 'Suffering is Penance' हे उनामुनोचे (स्पॅनिश लेखक) तत्त्वज्ञान स्वीकारले की, यातनाभोगाला मोक्षाचे साधन अथवा तपश्चर्या ठरविता येते. यातनांना, दु:खाला धर्माचा-अध्यात्माचा स्पर्श होताच शोकात्म घटना तपश्चर्या (पेनान्स) ठरते. जॉर्जगड युद्धानंतरच्या सर्व विपरीत घटना पाहून जॉर्जला वैराग्य आले. पण बेगम, लिस्सू आणि जॉर्ज यांची भौतिक पातळीवरील अप्रतिम अशी ही कथा शोकात्मिकाच आहे. कदाचित प्रा. तिवारी यांच्या आध्यात्मिक श्रद्धेतून हे शांतरसात परिवर्तन झाले असावे. बेगमने तर पापमुक्तिक्षमायाचनेलाही (कन्फेशन) नकार दिला. बेगमही विरक्त झाली. पण आत्मानंद देणाऱ्या शांत रसाचा तिने आश्रय घेतला नाही. पण एक गोष्ट मान्य केलीच पाहिजे की, कादंबरीचा शेवटचा भाग उत्कट कारुण्य (शोकात्मभाव) आणि परमानंद अवस्थेत नेणारा शांतरस यांचे अपूर्व संमीलन साधण्यात प्रा. तिवारी पूर्ण यशस्वी झाले आहेत. कारुण्यातूनच आत्मानंदाकडे जाता येते, अशी तिवारींची श्रद्धा आहे, असे वाटते.

मी येथे कलाकृतीच्या आकृतिबंधाचे विश्लेषण फारसे केले नाही; पण एक गोष्ट निश्चित आहे की, कादंबरीच्या शतकव्यापी कथानकाच्या आकृतिबंधातील अनेक धागे कलात्मक घाटात गुंफून एक भव्य, विशाल आणि लयबद्ध कलाकृती निर्माण करण्यात तिवारी यशस्वी झाले आहेत, हे निश्चित. नितांतरमणीय असे भाषेचे काव्यात्मसौंदर्य आणि जागोजागी प्रगट

झालेले तत्त्वचिंतन यांचा मेळ घालून वाचकाचे मन कादंबरीत खिळवून ठेवण्यात तिवारी पूर्ण यशस्वी झाले आहेत. एका गोष्टीतून दुसरी गोष्ट या 'अरेबियन नाइटस्' शैलीवर पूर्वार्धात थोडे बंधन घातले असते, तर कादंबरीचा रचनाबंध अधिक एकात्म झाला असता. मराठीतील ऐतिहासिक कादंबरीक्षेत्रात प्रा. तिवारी यांच्या दोन्ही कादंबऱ्या ('देवगिरी बिलावल' आणि 'बेगम समरु') पहिल्या पाच क्रमांकात सन्मानाने बसण्याच्या योग्यतेच्या आहेत, असे निश्चितपणे म्हणता येते. ■

प्रा. स. रा. गाडगीळ
द्वारा, के. एन. पटवर्धन, २९ सी, गणेशकृपा सोसायटी,
लेन नं. १४, वनाझसमोर, पुणे ४११ ०३८.

## नवे आजीव सभासद

फटांगरे-सागर अशोक लक्ष्मण, पुणे
तांबोळी गोविंद श्रीराम, पुणे
केळकर वैजयंती सुरेश, अंबरनाथ
माहेश्वरी सुनील शंकर, अंबरनाथ
साळुंखे आत्माराम महादू, अंबरनाथ
पगारे आत्माराम राघुजी, अंबरनाथ
कुलकर्णी उषाताई गुरूनाथ, अंबरनाथ
गोखले दीपा राजेश, अंबरनाथ
मुरकर रेश्मा सुरेश, पुणे
कोण्णूर मयुरेश गोपाळ, पुणे
ओक सरिता सतीश, बदलापूर
ओक सुधीर मुकुंद, बदलापूर
ओक स्नेहल विकास, बदलापूर
कापडे प्रशांत रमेशचंद्र, बदलापूर
कुलकर्णी विलास एकनाथ, बदलापूर
कुलकर्णी सुमित्रा जयंत, बदलापूर
जोशी अनंत श्रीकृष्ण, बदलापूर
दातार रवींद्र पांडुरंग, बदलापूर
महाजनी श्रीकांत, बदलापूर
शुक्ल भरतकुमार रघुनाथ, बदलापूर
साळुंखे जयवंतराव रामराव, बदलापूर
सोमण श्रद्धा संग्राम, बदलापूर
खांडेकर स्नेहा संजीव, अंबरनाथ
फडणीस दत्तात्रय एकनाथ, पुणे
नेटके निशा अशोकराव, पुणे
चौधरी रत्ना रमेश, पुणे
भोळे प्रतिभा मोरेश्वर, पुणे
क्यानम शैलजा श्रीनिवास, सोलापूर
काळे कल्याण वासुदेव, पुणे
साठे शुभदा सुरेश, पुणे
राठी जुगल किशोर, पुणे
गोखले रोहिणी शशीशेखर, पुणे
महाडिक शिवाजीराव आनंदराव, नांदगीरी
वर्गे प्रभाकर कृष्ण, कोरेगाव
यादव मधुकर बंडू, सायगाव (एकंबे)
घोरपडे किसन बयाजी, सारगाव
चव्हाण हरीबा ज्ञानदेव, एकंबे
केंजळे नानासाहेब नथू, कोरेगाव
घाडगे सुरेश यशवंत, कोरेगाव
डागा दिनेश खुशालचंदजी, पुणे
नामजोशी माधुरी अविनाश, पुणे
पुनावाला जाहिर ए., पुणे
कटेकर नामदेव विश्वनाथ, पंढरपूर
गीर नरेंद्र महादेव, पंढरपूर
केसकर राजेंद्र गोपाळ, पंढरपूर
भोईटे शिवाजी केशवराव, जळगाव
पोतदार प्रशांत विष्णूकांत, जळगाव
ताम्हनकर विद्यागौरी अभिजीत, पुणे
महाजन आश्लेषा, पुणे
कुलकर्णी महेंद्र प्रभाकर, पुणे
लेफ्टनंट कर्नल भिडे ग. भि., नागपूर
पाटकर उल्हास बाळकृष्ण, पुणे
पटवर्धन अमृता गिरीश, पुणे
फडणवीस शरद वासुदेवराव, पुणे
वैद्य कुर्मा कुरुथ पंडित, पुणे
वेडाळे विनीत योगेश, पुणे
वेडाळे योगेश नारायण, पुणे

## चुकीची दुरुस्ती

**शेरलॉक होम्सच्या पाच कथा :** अनुवाद बिंबा केळकर असे आहे. मागील अंकात 'बिंबा केळकर' च्या ऐवजी 'बिंबा निंबाळकर' असे चुकीचे आडनाव आले आहे. क्षमस्व !

# उद्याच्या सुंदर दिवसासाठी : मुक्त चिंतनाचा कलात्म आविष्कार

❑

अविनाश आवलगावकर

❑

*('उद्याच्या सुंदर दिवसासाठी' : नागनाथ कोत्तापल्ले, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे : १५६, किंमत रु. १००/-)*

जीवन जगण्यातून मानवी मनावर विविध ताण निर्माण होत असतात. हे ताण बरेचदा तात्कालिक स्वरूपाचे असले, तरी मनावर त्याचा ठसा कायमस्वरूपी उमटला जातो. कधी ते एखाद्या घटनेशी, व्यक्तीशी संबंधित असतात, तर कधी एखाद्या विचारातून निर्माण झालेले असतात. लेखक-प्रकृतीच्या माणसाला हे ताण अभिव्यक्त झाल्याशिवाय चैन पडत नाही. हे ताण मुक्त स्वरूपाच्या ललित गद्यातून अधिक समर्थपणे अभिव्यक्त होतात. डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचे 'उद्याच्या सुंदर दिवसांसाठी' हे मुक्तचिंतन अशा स्वरूपाचे आहे. यातील विषयाचे वैविध्य आणि कलात्मक अभिव्यक्ती याबरोबरच या विचारांमागे उभी असणारी लेखकाची संवेदनशीलताही अधिक महत्त्वाची आहे.

डॉ. नागनांथ कोत्तापल्ले उद्याच्या सुंदर दिवसांचे चित्र मनात रेखाटीत असले, तरी ते वर्तमानासंबंधी अधिक सजग आहेत. किंबहुना म्हणूनच उद्याचा विचार ते अधिक गंभीरपणे करू शकतात. धर्म, जात, स्त्रीविषयक विविध प्रश्न, बेकारी, तरुणांची मानसिकता, बालकामगार, शिक्षणविषयक समस्या, राजकारण, साहित्यातील वर्तुळबाजी इत्यादी विविध विषयांच्या मुळाशी जाऊन त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न डॉ. कोत्तापल्ले करतात. कधी मिष्किलपणे, कधी गंभीरपणे तर कधी औपरोधिकतेने या विविध समस्यांकडे ते पाहतात. सर्वच पातळ्यांवर समाज कसा किडत चालला आहे, हे यामागचे खरे वास्तव आहे. वैज्ञानिक आणि वैचारिक दृष्टीने आपली कितीही प्रगती झाली असली, तरी आपली नाळ, जात आणि धर्माशीच कशी बांधलेली आहे, या संबंधीचे त्यांचे विवेचन मर्मग्राही आहे. 'जातीच्या महामंत्राचा जागर', 'बाबरी मशिदीच्या निमित्ताने', 'दुभंगे धरणी, फाटे हे आकाश', 'बाबा घालिती गोंधळ' इत्यादी लेखांतून ते प्रत्ययाला येते. येथे राजकारण आणि समाजकारण यालाही जातीधर्माचे आवरण आहे. खरे तर धर्मभेद, जातीभेद, प्रांतिकभेद अशा कुठल्यातरी भेदांमध्ये अडकूनच आपण आपल्याभोवती एक वर्तुळ तयार करतो आणि या वर्तुळाला कोणी छेद दिला, की मग संघर्षाचा पवित्रा घेतो. किल्लारीच्या प्रचंड मानवी संहारातून वाचलेल्या निराधार मुलांची जात कोणती? त्यांना जातीशिवाय कसं जगता येणार? हा गंभीर प्रश्न डॉ. कोत्तापल्लेंना अधिक अस्वस्थ करतो. खरे तर आपण एकीकडे जात विसरत असतानाच सरकार दरबारच्या कोणत्याही

कागदपत्रावर जातीचा रकाना भरतच असतो. डॉ. कोत्तापल्लेंच्या मते, सगळ्यात गंभीर समस्या कोणती असेल तर ती 'भारतीय आयडेंटिटी'चीच आहे. म्हणून आपली मानसिकता बदलायला हवी, अशी परिवर्तनाची अपेक्षा यामागे आहे.

'मांजर आता उघड्या डोळ्यांनी दूध पीत आहे' यासारख्या निबंधातून तर डॉ. कोत्तापल्लेंनी समाजातील अनेक गंभीर प्रश्नांवर आपले लक्ष केंद्रित केले आहे. सर्वसामान्य स्त्री-पुरुषांवर होणारे अन्याय, अत्याचार, समाजातील वाढत जाणारी गुंड प्रवृत्ती, बघ्यांची भूमिका घेणारी माणसे इत्यादी प्रश्न आज समाजातील वास्तव प्रश्न आहेत. स्वातंत्र्यापूर्वी माणसांचा समूह एकत्र आला म्हणूनच इंग्रजांना हाकलून लावता आले. आज चांगल्या मूल्यांसाठी लोक का एकत्र येत नाहीत? हा प्रश्न सर्वच भारतीयांच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरतो. कधीकधी तर आपण मानवता हे मूल्यच हरवून बसतो. किल्लारीच्या भूकंप पीडितांसाठी सर्व स्तरांतून झालेली मदत, अन्नाची पाकिटे, मृतांच्या अंगावरील सोने हे परस्पर फस्त होत होते. तेव्हा ज्ञानेश्वर, तुकाराम, फुले-आंबेडकरांचा वारसा सांगणाऱ्या या देशाला काय म्हणावे, हा प्रश्न फक्त डॉ. कोत्तापल्लेंपुरताच मर्यादित राहात नाही. 'दुभंगे धरणी फाटे हे आकाश' आणि 'माणसे शिकली-कर्ती धर्ती झाली' हे किल्लारीच्या दुर्घटनेवर आधारित दोनही लेख खूप बोलके आहेत.

शिक्षण आणि मानवी मूल्य याचा खरोखर अर्थाअर्थी संबंध आहे का? शिक्षणाने माणसं समंजस होतात का? या प्रश्नांची उत्तरे आजच्या शिक्षणव्यवस्थेतच शोधायला हवीत. 'उद्याच्या सुंदर दिवसांसाठी' हा या संग्रहातील एक महत्त्वाचा लेख सबंध शैक्षणिक प्रक्रियेवर प्रकाश टाकणारा आहे. फुले-आंबेडकर-शाहू महाराजांचा वारसा सांगणारे, स्वत:चा मुलगा चांगल्या गुणांनी पास करवून घेतात. त्याच्यातील आत्मविश्वास जागवण्याऐवजी त्याचे खच्चीकरण करून, त्याला परावलंबी बनवतात. डॉ. कोत्तापल्ले लिहितात — 'महात्मा फुले व डॉ. आंबेडकरांचे नाव घेणे सोपे असते. पण स्वार्थासाठी त्यांचा वापर करणार नाही, अशी प्रतिज्ञा करणे अवघड असते.' (पृ. ७९) आज तरी या महापुरुषांच्या नावाचा विचार स्वार्थासाठी करणारेच अधिक आढळतात. शैक्षणिक मूल्यांकडे शिक्षक, पालक आणि विद्यार्थी या तिन्ही घटकांनी अतिशय जबाबदारीने बघायला हवे. स्वत:ला ज्ञानाचे पुतळे समजून विद्यार्थ्यांच्या बुद्धिमत्तेला कोठेच वाव न देणारे शिक्षक (प्रिय बाई), बायकोला परीक्षेत पास करून घेण्यासाठी परीक्षकाचे पाय धरणारा व पुढे प्राध्यापक म्हणून तिची निवड व्हावी, यासाठी प्रयत्न करणारा लोचट कॉन्ट्रॅक्टर (तात्पर्य: ज्याचे त्याने शोधावे) हे सारेच वास्तव चिंतनीय आहे.

साहित्यातील राजकारणासंबंधी लेखकाने असंतोष व्यक्त केला आहे. कवी-लेखकांमधील प्रसिद्धीचा हव्यास, गटबाजी करून एकमेकांची प्रशंसा करणे इत्यादी गोष्टी हे साहित्य क्षेत्रातील वास्तव होय. प्रत्येक कवी-लेखक एक स्वत:चं वर्तुळ तयार करून साहित्याचे झेंडे अटकेपार नेण्याचा प्रयत्न करतो. या निर्मितीमागे किती प्रामाणिकपणा असतो? विविध पुरस्कारांच्या संदर्भातही याचीच प्रचिती येते. अगदी पुरस्कारांच्या संदर्भातही याचीच प्रचिती येते. अगदी साहित्य अकादमी व राज्य पुरस्कारांपासून तो गल्ली-बोळातील पुरस्कारापर्यंत या गटबाजीचाच वास येत नाही का?

या ललित लेखांमधून अनेक व्यक्तिमत्त्वांच्या अंतर्मनाचा शोध घेण्याचा प्रयत्नही लेखकाने केला आहे. 'ते भिंतीआडचे डोळे'मधील काम द्या म्हणणारा तरुण, 'सुभाष सानपची गोष्ट'मधील नोकरीसाठी दारोदार फिरणारा सुभाष, वाचकांच्या मनाचा ठाव घेणारे आहेत. त्यांचा प्रामाणिकपणा कोणाच्याच लक्षात येत नाही, हे डॉ. कोत्तापल्लेंच्या संवेदनशील मनाचे बोचरे शल्य आहे. बालकामगारांच्या भवितव्याचा वेध घेणारे कलाशिक्षक रामदास चिंचोळे आणि अनेकांना वटवृक्षाची सावली देणारे मार्क्सवादी विचारवंत डॉ. शाकिर ही उत्तुंग व्यक्तिमत्त्वेही लेखकाची आकर्षण केंद्रे ठरतात. डॉ. शाकिरांच्या संदर्भात डॉ. कोत्तापल्ले लिहितात — 'ते जिथे काम करीत होते, तिथे सामान्य कुवतीच्या माणसांचे एक कोंडाळे तयार झाले होते... ही माणसं हिंस्र होती... शेवटी या कोल्ह्यांनी बळी घेतलाच' (पृ. १०६) याचा अर्थ डॉ. शाकिरांच्या मृत्यूमागे हे कोंडाळे असावे, असे दिसते. पण त्याचे स्पष्टीकरण होत नसल्याने वाचकांसाठी ते धूसर राहते. डॉ. शाकिरांच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश टाकणारे काही अनुभव दिले असते, तर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची उत्तुंगताही स्पष्ट झाली असती.

'उद्याच्या सुंदर दिवसांसाठी' या ललितगद्यातील सर्वच लेख मानवी जीवनाला विविध स्तरांवरून स्पर्श करणारे आहेत आणि त्यामुळेच ते अधिक वाचनीय झालेले आहेत. 'मृत्यूच्या प्रदेशात' यातून मृत्युविषयीचं केलेले एक सखोल चिंतन, मनातून मृत्युविषयीची भीती घालवणारे ठरते. तर 'चोली के पीछे क्या है' या प्रश्नाचे दिलेले उत्तर स्त्रीविषयक मानसिक परिवर्तनाला प्रेरित करते. डॉ. कोत्तापल्लेंना हे परिवर्तन मानवी जीवनाच्या सर्वच स्तरांवर अपेक्षित आहे. मानवी मूल्यांवर त्यांचा विश्वास आहे आणि म्हणूनच उद्याच्या सुंदर दिवसांसाठी ते आशावादी आहेत. ■

: अविनाश आवलगावकर
मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.

---

## स्वागत

- ❑ **प्रेमाचे मधुशास्त्र :** मधुसुदन घाणेकर, प्रकाशक - मधुसुदन घाणेकर, पुणे.
- ❑ **एकनाथी भागवत :** (शब्दार्थ-संदर्भ-कोश) संपादक : डॉ. मु. श्री. कानडे, श्री. रा. शं. नगरकर, रामकृष्ण प्रकाशन, पुणे.
- ❑ **सामाजिक कार्याच्या दिशा :** नागोराव कुंभार, प्रबोधन प्रकाशन, लातूर.
- ❑ **आकाश पुष्प :** विजया द. जोशी, आशिष प्रकाशन, पुणे.
- ❑ **मृत्युपत्र :** अरुण गोडबोले, प्रकाशक - अरुण गोडबोले, सातारा.
- ❑ **अंतर्कळा :** अरुण गोडबोले, प्रकाशक - अरुण गोडबोले, सातारा.
- ❑ **सामाजिक कामाच्या दिशा :** नागोराव कुंभार, प्रबोधन प्रकाशन, लातूर.
- ❑ **आक्रित :** बबन पोतदार, माधवी प्रकाशन, पुणे.
- ❑ **पत्रांच्या अंतरंगातून डॉ. नानासाहेब आंबेडकर :** माधवी खरात, श्री समर्थ प्रकाशन, पुणे.

---

# एक नवा वीरनायक : बहादूर बल्लू

❑

## शैलजा देशमुख

❑

*(बहादूर बल्लू : ले. डॉ. लीला दीक्षित, प्रकाशक : मेनका प्रकाशन, विजयानगर कॉलनी, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०, मूल्य ४५ रुपये)*

**बा**लकुमारसाहित्याचा विचार करीत असताना एक गोष्ट सहज लक्षात येते की, समाजातील अन्याय, भ्रष्टाचार दूर करण्यासाठी धडपडणाऱ्या मुलांच्या व्यक्तिरेखा बालवाचकांच्यात विलक्षण प्रिय असतात, त्यांना स्फूर्ती देतात, त्यांचा आदर्श बनून राहतात. कुमारांना असे वीरनायक हवे असतात की, ज्यांच्या कृतीत ते आपली स्वप्नं पुरी झाल्याचे बघतात, त्यांच्याशी दोस्ती करतात. जग सुधारण्याची तळमळ त्यांना लागलेली असते. ना. धों. ताम्हनकरांचा 'गोट्या', 'चिंगी', वि. वि. बोकील यांचा 'वसंत', भा. रा. भागवतांचा 'फास्टर फेणे', दिलीप प्रभावळकरांचा 'बोक्या सातबंडे' या आपल्या पूर्वसुरींना वाट पुसत मोठ्या दिमाखात आला आहे, डॉ. लीला दीक्षित यांचा 'बहादूर बल्लू!'

'बहादूर बल्लू'ची व्यक्तिरेखा खुलवताना एका साहसाची कथा अलगद उलगडली जाते. कथानकात तर वाचक गुंगून जातोच; पण त्याचबरोबर अनेकगुणसंपन्न अशी बल्लूची व्यक्तिरेखा कुमारमनावर नकळत एक चांगल्या संस्काराचा ठसा उमटवून जाते, हे या बालकादंबरीचे वैशिष्ट्य! बल्लूची व्यक्तिरेखा खुलवताना खुसखुशीत विनोदी शैलीचा लेखिकेने केलेला वापर प्रसन्न विनोदाचा छानसा शिडकाव करून जाते. साहसाइतकेच विनोदाचे मुलांच्या मनावर प्रभुत्व असते, याची जाण लेखिकेला आहे. संपूर्ण कादंबरीतले वातावरण, प्रसंग, व्यक्तिरेखा यातून लेखिकेच्या मनाची 'सात्विका'विषयीची ओढ व्यक्त होते.

श्री. भा. रा. भागवत यांनी बालकुमार साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना असं म्हटलंय की, 'मुलांना मार्गदर्शन करा, पण सांभाळून. स्वत: विचार करून शोधण्याची, मार्ग काढण्याची त्यांची वृत्ती घालवू नका; उलट ती वाढवा.'

या कादंबरिकेतील बल्लूचे आजोबा आणि त्यांचे प्रौढ मित्र जठारकाका हे जणू ह्या विचाराचे प्रवर्तक असावेत, असे वागताना दिसतात. जठारकाका या मुलांना सुटीच्या दिवशी पक्षी-अभयारण्यात, डोंगरावर सहलीला नेतात; त्यांचे कुतूहल शमवतात, त्यांच्या मनातील साहसाची ओढ नकळत जोपासतात. बल्लूचे आजोबा आणि बल्लू यांचे भावसंबंध तर फारच हृद्य. आजोबा बल्लूला संगीत शिकवतात, रामरक्षा म्हणून घेतात, त्याच्या मागणीवरून मोडी लिपी शिकवतात. त्याच्या वर्तनाकडे त्यांचे बारीक लक्ष आहे; पण ते त्याच्या व्यक्तिमत्त्वाला मारक न ठरता पोषकच ठरते. लुटुपुटूची लढाई खेळताना वाडीतील रोपांचा विध्वंस करणाऱ्या बालचमूचे मानसशास्त्र त्यांना समजू शकते. बल्लूचे नाटकातील काम छान व्हावे, म्हणून त्यांचे सजग असणे हे सर्व इतके

गोड आहे की, ही कादंबरी वाचताना असे छान आजोबा असल्याबद्दल बल्लूचा हेवा वाटावा. या कथेतील बल्लू आणि मित्रमंडळी ही फारच 'आदर्श' वर्तन करणारी मुलं. पण आपली साहसी मोहीम पार पडताना तिचा सुगावा मोठ्यांना लागू नये, म्हणून थोड्या थापा मारूनही घराबाहेर पडतात.

कादंबरीतील संपूर्ण कथानकाला कोकणाची पार्श्वभूमी आहे. कोकणातील समुद्रकाठच्या, नारळी-पोफळीच्या बागांनी समृद्ध अशा एका गावात ह्या घटना घडतात. एका पांढरपेशा मध्यमवर्गीय, चारित्र्यसंपन्न अशा घरातील बल्लू आणि त्याचे तसेच मित्रमंडळ यांची ही कथा. एक दिवस समुद्रकाठच्या बावकरांच्या कोरड्या विहिरीतून काहीतरी ओढत समुद्रकिनाऱ्याकडे जाणाऱ्या अज्ञात व्यक्ती या धडपड्या मुलांना दिसतात. त्यांचे कुतूहल जागे होते. काय असेल या निर्जन, ओसाड, कोरड्या विहिरीत? त्यातच जठारकाकांबरोबर पक्षी-अभयारण्यात सहलीला गेल्यावर कंपाऊंडला लावलेली शिडी आणि तिचे अचानक गायब होणे, तिथे पडलेली जाळी, समुद्रावरील दिसलेला लंगडा माणूस तिथेही दिसणे या सगळ्यात एक दुवा या मुलांच्या अंतर्मनाला जाणवू लागतो आणि सुरू होते एक शोधमोहीम. अतिशय तर्कशुद्ध पद्धतीने, शांत डोक्याने या सर्वामागील रहस्य ही धाडसी मुले शोधून काढतात. या साहसमोहिमेची ही कथा. रात्री वाडीत फिरणाऱ्या वाघाचे रहस्य, नाटकातील संवाद म्हणताना बल्लूने केलेली गडबड, गावातील मारुतीच्या देवळातील मूर्तीची चोरी या प्रत्येक प्रसंगातून वाचकाची उत्सुकता वाढत जाते. तरीही एक गोष्ट ही कथा वाचताना लक्षात येते की, या साहसमोहिमेचा प्रवास तसा सरळ रेषेत जाणारा आहे! यात फारसे रोमांचकारी प्रसंग नाहीत की भावभावनांचे ताणतणाव नाहीत.

समाजातील बऱ्या-वाईट घटनांशी मुलांचाही क्षणाक्षणाला संबंध येत असतो. वर्तमानपत्रातून तस्करीच्या, चोरीच्या, गुन्हेगारीच्या वातम्या ती वाचत असतात. कुठल्याही सत्प्रवृत्त माणसाला क्षणिक राग येतो. मुलंही याला अपवाद नसतात. त्यामुळे या कादंबरीतील या दुष्ट प्रवृत्तीचा विमोड करण्यासाठी धडपडणारी बल्लू आणि कंपनी बालकुमार वाचकांना नक्कीच आवडेल. मात्र अनुभवांची तीव्रता आणि सखोलता याबाबतीत हे पुस्तक कुठेतरी कमी पडते, असे जाणवते. बल्लूच्या घरातील वातावरण, त्याच्या मित्रमंडळाचे एकमेकांशी वागणे हे सर्व इतके आदर्शवादी आहे की, कुठल्याच नात्यातील ताण-तणाव, साधे लहान मुलांच्यातील हेवेदावे, मतभेद यांचे दर्शन येथे होत नाही. सुष्ट विरुद्ध दुष्ट असा सिधासाधा, खुला, सोपा लढा येथे आहे.

एकूणच साहसकथांची पुस्तकं वाचताना, चोर पकडणं, तस्करी शोधणं, गुंडांचा सामना किंवा इतर अशाच प्रकारचं साहस याचं चित्रण केले गेलेले दिसते. हे पुस्तकही याला अपवाद नाही. एकूण प्रतिकूल परिस्थितीशी झगडत, पुढे येणाऱ्या समस्यांना सामोरं जाऊन त्यातून मार्ग काढणं म्हणजे साहस. अशा प्रकारचे साहस विलक्षण रोमांचकारी असते. विचित्र अकल्पित समस्यांना सामोरं जाणं, त्यासाठी लागणारी धडपड, आशा-निराशा, आनंद, अदम्य उत्साह यांचं पारदर्शक चित्रण असणाऱ्या साहसकथा बोटावर मोजण्याइतक्याच! आंतरिक संघर्ष तर नाहीच, पण फारसा बाह्य संघर्षही ह्या मुलांच्या वाट्याला येत नाही. त्यामुळे त्यांचे साहस हे थोडेफार एकरंगी बनते. अर्थात ही प्रतिक्रिया कदाचित प्रौढ मनाची!

प्रौढ वाङ्मयासाठी वापरल्या जाणाऱ्या समीक्षेच्या फूटपट्ट्या आणि परीक्षणाचे मानदंड बालसाहित्याला लावणे उचित ठरणार नाही. बालकुमार वाचकावर साहित्याचे परिणाम अजाणतेपणे खोलवर होत असल्याने ते केवळ करमणुकीसाठी नसून माणूस घडविण्याचे जीवनसापेक्ष साधन आहे, या भूमिकेतून बव्हंशी लेखक लेखन करीत असतात; हे एकदा मान्य केले की, बालसाहित्याकडे बघण्याचा आपला दृष्टिकोन बदलून जातो. अर्थात् निखळ मनोरंजन आणि संस्कारक्षमता या दोन्हीचा तोल साधताना बालकुमार साहित्यिकाला तारेवरची कसरत करावी लागते. डॉ. लीला दीक्षितही याला अपवाद नाहीत. अतिशय जाणीवपूर्वक केले गेलेले लेखन हे त्यांच्या लेखनाचे खास वैशिष्ट्य. 'बहादूर बल्लू' मध्ये या दोन्ही भूमिका सांभाळण्याचे कौशल्य व्यक्त होते, हा या कादंबरीचा विशेष गुण.

अद्‌भुतरस, वीररस हे मुलांचे फार आवडते रस अन् हास्यरस तो तर परममित्र! हे पुस्तक अशा बालांच्या आवडत्या रसांनी समृद्ध असून त्यांच्यासमोर एक छान आदर्श, गुणसंपन्न असा नायक उभा करते.

कादंबरीला लाभलेली कोकणाची पार्श्वभूमी, त्यातील खास प्रादेशिक वातावरण लेखिकेने चित्रमय भाषेत सजीव केले आहे. तेथील निसर्गाची विलोभनीय दृश्ये, घरांची, वाडीची रचना, गावातील सांस्कृतिक वातावरण यातून बल्लूचा गाव आपल्या डोळ्यांपुढे उभा राहतो. भर दुपारचे लेखिकेने केलेले हे वर्णन पाहा :

'झावळ्यांमधून ऊन झिरपत असल्याने वाडीत तसा उन्हाचा कडाका नव्हता. वाडी संपते तिथे लांबच लांब समुद्रकिनारा होता. समुद्राच्या लाटा किनाऱ्यावर धडकत होत्या. वैशाखाच्या उन्हाचे कडके, वाळू प्रचंड तापलेली असणार... संपूर्ण पाच मैलाच्या किनाऱ्यावर चिटपाखरूही नव्हते...'

हे अन् अशी अनेक बोलकी चित्रे या पुस्तकात भेटतील. आकाशातील पोपटांची हिरवी चादर, माडावरचे खंड्यापक्षी, मोर, लांडोरी असे अभयारण्याचे वर्णन, साक्षात् तेथील निसर्ग आपल्यासमोर उभे करणारी अतिशय प्रत्ययकारी वर्णनशैली या पुस्तकाची विलोभनीयता वाढवते आणि अशा सर्व वर्णनाला सुंदर चित्रांची जोड लाभली तर पुस्तक अधिक आकर्षक होते, याचाही प्रत्यय हे पुस्तक वाचताना येतो. बालवाङ्मयात पुस्तकाच्या बहिरंगालाही खूप महत्त्व असते.

चांगल्या लेखकाला समजदार प्रकाशक आणि कल्पक चित्रकाराची साथ लाभली की, पुस्तक अधिक आकर्षक होतं. 'मेनका प्रकाशन'ने हे पुस्तक मोठ्या दिमाखात प्रकाशित केले आहे. चित्रकार गिरीश सहस्रबुद्धे यांची रेखीव चित्रे, बल्लू आणि मित्रकंपनीचे बोलके चेहरे, यथार्थ प्रसंगचित्रण यामुळे पुस्तकाच्या सौंदर्यात निश्चित भर पडते.

एकूणच एका साहसाची आकर्षक मांडणी, संस्कारक्षम व्यक्तिरेखा, सुयोग्य रसपरिपोष, विनोदी मिष्किल भाषाशैली या अन् अशा वैशिष्ट्यांनी संपन्न अशी ही बालकादंबरी बालवाचकांनी निश्चितच आवर्जून वाचावी अशीच आहे, हे निःसंशय! ■

शैलजा देशमुख

बी-७१५, गुरुराज सोसायटी, पद्मावती, पुणे ४११ ०३७. दूरध्वनी : ४३७०५८७.



अनुक्रमणिका

# कार्यवृत्त (१ जुलै २००१ ते ३० सप्टेंबर २००१)

संकलन : ह. ल. निपुणगे, प्रमुख कार्यवाह

## स्मृतिदिन व व्याख्याने

***दि. ८ जुलै २००१ :***

कै. र. वा. दिघे स्मृतिदिनानिमित्त वालचंदनगरचे ग्रामीण कथालेखक व कथाकथनकार श्री. बा. ग. केसकर यांचे कथाकथन व एकूण ग्रामीण कथेच्या संदर्भात मुक्त विवेचन असा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. प्रमुख कार्यवाह श्री. ह. ल. निपुणगे यांनी प्रारंभी प्रसिद्ध कथालेखक कै. व. पु. काळे यांना श्रद्धांजली वाहून नंतर प्रास्तविक व वक्त्यांचा परिचय करून दिला. कार्यवाह श्री. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

***दि. १७ जुलै २००१ :***

शा. अण्णाभाऊ साठे स्मृतिदिनानिमित्त म. सा. परिषद व दलित साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने 'कै. अण्णाभाऊ साठे : जीवन आणि साहित्य' ह्या विषयावर श्री. विलास वाघ यांचे व्याख्यान झाले. श्री. ह. ल. निपुणगे यांनी प्रास्ताविक व परिचय करून दिला व दलित साहित्य परिषदेचे विद्यमान अध्यक्ष बाळ आल्हाट यांनी आभार मानले.

कार्यक्रमानंतर दलित साहित्य परिषदेचे इतर पदाधिकारी आणि म. सा. परिषदेचे डॉ. गं. ना. जोगळेकर व दीपक करंदीकर यांच्या उपस्थितीत दलित साहित्य परिषदेच्या सहकार्याने अधिक काही कार्यक्रम करता येतील का, ह्या दृष्टीने चर्चा झाली.

***दि. २० जुलै २००१ :***

कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त वाई शाखेचे अध्यक्ष प्रा. विजयकुमार फरांदे यांचे 'मराठी कादंबरीचे भवितव्य' ह्या विषयावर व्याख्यान झाले. वाईच्याच म. सा. प. शाखेचे कार्यवाह श्री. मधू नेने यांनी प्रास्तविक व परिचय करून दिला. श्री. ह. ल. निपुणगे यांनी दोघांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला व दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

***दि. ३१ जुलै २००१ :***

सायंकाळी ठीक ६॥ वा. पटवर्धन सभागृहात संत सावतामाळी स्मृतिदिनानिमित्ताने 'समर्थांचे पंचसमासी ग्रंथ' या विषयावर डॉ. ग. वा. करंदीकर यांचे अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. श्री. ह. ल. निपुणगे यांनी प्रास्ताविक व दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

***३ सप्टेंबर २००१ :***

### डॉ. व. दि. कुलकर्णी श्रद्धांजली सभा :

मराठीतील श्रेष्ठ समीक्षक, संशोधक व शिक्षक यांचे वयाच्या ७८ व्या वर्षी २५ ऑगस्ट २००१ या दिवशी निधन झाले. त्या निमित्त आयोजित श्रद्धांजली सभेत सौ. निरगुडकर (वदिंची कन्या) वदिंचे वर्गबंधू मधुकर कुलकर्णी, शकुंतला क्षीरसागर, स्वाती कर्वे, मेधा सिधये, पुरुषोत्तम पाटील, वीणा देव, चंद्रशेखर बर्वे, द. दि. पुंडे, प्रकाशक श्री. अरुण जाखडे, श्यामला सुरू, डॉ. प्र. ल. गावडे, प्र. द. पुराणिक यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली. तसेच म. सा. प. तर्फे डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी श्रद्धांजलीपर भाषण केले आणि म. सा.प.चे उपाध्यक्ष

डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांनी समारोप केला.

मुंबई मराठी साहित्य संघ व म.सा.प., पुणे या दोन्ही संस्थांतर्फे ठराव-वाचन अनुक्रमे नंदा सुर्वे व दीपक करंदीकर यांनी केले.

***दि. ४ सप्टेंबर २००१ :***

**कै. व्यंकटेश माडगूळकर श्रद्धांजली सभा :** मराठीतील ज्येष्ठ लेखक, कथाकार, कादंबरीकार, व्यक्तिचित्रकार, प्रवास वर्णनकार, नाटककार व्यंकटेश माडगूळकर यांचे वयाच्या ७४ व्या वर्षी २८।८।२००१ रोजी निधन झाले. त्याच दिवशी दुपारी ३ ते ३।। या वेळात कै. व्यंकटेश माडगूळकर यांचे पार्थिव मसापच्या पटवर्धन सभागृहात दर्शनार्थ ठेवण्यात आले होते. मंगळवार दि. ४ सप्टेंबर २००१ रोजी कै. व्यंकटेश माडगूळकर यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी श्रद्धांजली सभा परिषदेत आयोजित करण्यात आली. जयदेव माडगूळकर, ज्ञानदा नाईक (कै. तात्यांच्या कन्या), श्रीधर माडगूळकर, आटपाडीचे श्री. मोकाशी, श्रीराम मांडे, रविमुकुल, खंडेराव केळकर, प्रकाशक सु. वा. जोशी, अरुण जाखडे, शशिकांत कुकलर्णी, बाबा पाठक, द. मा. मिरासदार, डॉ. गं. ना. जोगळेकर व श्री. पु. भागवत इत्यादींची श्रद्धांजलीपर भाषणे झाली व शेवटी परिषदेचे कार्यवाह दीपक करंदीकर यांनी ठराव-वाचन केले.

***दि. ११ सप्टेंबर २००१ :***

कवी अनिल जन्मशताब्दी निमित्त निमंत्रितांचे कविसंमेलन झाले. नाशिकचे कवी किशोर पाठक यांची सन्माननीय उपस्थिती लाभली होती. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी कवी अनिलांविषयी प्रास्तविक केले. डॉ. कल्याण इनामदार यांनी अनिलांच्या काही निवडक रचना सादर केल्या. हेमंत जोगळेकर, प्रियदर्शन पोतदार, मनोहर सोनवणे, संगीता वर्वे, मनीषा दीक्षित, संजीवनी बोकील, आसावरी काकडे, इत्यादी कवींनी आपल्या कविता सादर केल्या. अंजली कुलकर्णी यांनी सूत्रसंचालन केले व परिषदेच्या कार्यवाह नंदा सुर्वे यांनी आभार मानले.

***दि. २६ सप्टेंबर २००१ :***

**कै. पु. भा. भावे स्मृतिदिन :** महाराष्ट्र साहित्य परिषद व कै. पु. भा. भावे स्मृतिसमिती यांच्या संयुक्त विद्यमाने यंदाचा भावे स्मृतिदिन २६ सप्टेंबर रोजी आयोजित करण्यात आला. ह्या कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान श्री. श्री. म. जोशी यांनी भूषविले. डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी प्रास्तविक केले. तसेच श्री. गो. रा. जोशी यांचे 'कै. पु. भा. भावे यांची नाटके आणि कै. वा. य. गाडगीळ यांचे नाट्य कर्तृत्व' या विषयावर भाषण झाले. तसेच समितीतर्फे दिल्या जाणाऱ्या पुरस्कारांचे या प्रसंगी वितरण झाले.

'संतकृपा'चे संपादक श्री. ना. वि. काकतकर यांना रु: १०००/- रोख व स्मृतिचिन्ह देऊन गौरविण्यात आले. त्यांनी सत्काराला यथोचित उत्तर दिले. त्याचप्रमाणे समितीतर्फे देण्यात येणारे 'लेखकपत्नी' पुरस्कार रु. १०००/- रोख व स्मृतिचिन्ह यंदाच्या वर्षी प्रथमच सौ. इंदूताई ढेरे यांना देण्यात आला. पु. भा. भावे स्मृतिसमितीचे एक कार्यकर्ते श्रीधर सहस्रबुद्धे यांनी पुरस्कारासंबंधी निवेदन केले व परिषदेचे कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**दीपक करंदीकर,** कार्यवाह

**पारितोषिक समारंभ :**

***दि. १४ जुलै २००१ :***

कै. बाबूराव शिरोळे यांच्या स्मरणार्थ बालकुमार साहित्य प्रकारातील एका ज्येष्ठ लेखकास रु. २५००/- चे पारितोषिक देण्यात येते. यावर्षी हे पारितोषिक वृंदा लिमये यांना देऊन गौरवण्यात आले. तसेच कै. शांतादेवी शिरोळे यांच्या स्मरणार्थ एका लेखिकेस रु. २०००/- चे पारितोषिक देण्यात येते. यावर्षी मंगला गोडबोले यांना हे पारितोषिक प्रदान करण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षा सरिता पदकी होत्या. कार्यक्रमाचे प्रास्तविक व सूत्रसंचालन नंदा सुर्वे यांनी तर डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार मानले.

***२२ जुलै २००१ :***

**कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिन :**

ग्रामीण साहित्य प्रकारातील उत्कृष्ट पुस्तकाच्या लेखकास हा रु. २१००-चा पुरस्कार देण्यात येतो. यावर्षी श्री. दादाभाऊ गावडे यांना त्यांच्या 'वसवा' या कादंबरी लेखनासाठी पुरस्कार देण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. नागनाथ कोत्तापले होते. कार्यक्रमाचे प्रास्तविक श्री. ह. ल. निपुणगे यांनी केले. परीक्षकांतर्फे अरुण जाखडे यांनी मनोगत व्यक्त केले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले व आभार मानले. सहपरीक्षक म्हणून डॉ. कल्याण इनामदार यांनी काम पाहिले.

***१ ऑगस्ट २००१ :***

कै. शंकर पाटील यांच्या स्मृतिदिनानिमित्त कादंबरी व कथासंग्रह यांना आलटून पालटून पुरस्कार देण्यात येतो. हा रु. २००० चा पुरस्कार यावर्षी श्री. एम. डी. लहानकर यांना त्यांच्या 'कातरवेळ' या कथासंग्रहासाठी प्रदान करण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी श्री. राजेंद्र बनहट्टी होते. श्री. ह. ल. निपुणगे यांनी प्रास्तविक केले. नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले व आभार प्रदर्शन दीपक करंदीकर यांनी केले. परीक्षकांतर्फे अंजली कुलकर्णी यांनी मनोगत व्यक्त केले. सहपरीक्षक म्हणून मेधा राजहंस यांनी काम पाहिले.

**नंदा सुर्वे**, कार्यवाह

**५ वे ठाणे जिल्हा साहित्य संमेलन :**

**अंबरनाथ शाखा - *२ व ३ जून २००१***

म. सा. प. ठाणे जिल्हा शाखा ही साहित्य परिषदेची एक सक्षम, उपक्रमशील व साहित्य चळवळीशी एक 'व्रती' म्हणून बांधली गेलेली शाखा. या शाखेने जिल्हा साहित्य संमेलनाची मुहूर्तमेढ रोवली आणि बघता बघता जिल्हा संमेलनाने ५ व्या वर्षांत पदार्पण केले. म. सा. प. च्या अंबरनाथ शाखेने 'जिल्हा संमेलनाची जबाबदारी घेतली आणि ठाणे जिल्हा शाखा व अंबरनाथ शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने ५ वे ठाणे जिल्हा साहित्य संमेलन दिमाखात पार पडले. कथा, कविता, समीक्षा इ. क्षेत्रात त्यांच्या लेखणीच्या नव्या आविष्काराने नवजाणीवांचा आविष्कार झाला आहे, अशा साहित्यिक डॉ. अरुणा ढेरे यांच्या अध्यक्षतेखाली हे संमेलन अत्यंत उत्साहात ठरलेल्या वेळी आणि वैविध्यपूर्ण पद्धतीने साजरे झाले. दि. २ जूनच्या उद्‌घाटन सोहळ्यात परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर व संमेलनाध्यक्षा डॉ. अरुणा ढेरे यांची विचार प्रवर्तक भाषणे झाली. ५०० ते ५५० रसिकांची उपस्थिती, विविधतेने नटलेले कार्यक्रम, उत्तम भोजन व चहापान व्यवस्था, प्रतीकात्मक ग्रंथदिंडीचा सोहळा, पुस्तक प्रकाशन, स्मरणिका प्रकाशन, इ. लक्षणीय विशेषांनी



अनुक्रमणिका

अखिल भारतीय साहित्य संमेलनाची हे संमेलन छोटी प्रतिकृतीच ठरले.

दीड दिवसांच्या या सोहळ्यात दोन परिसंवाद, एक मुलाखत, जिल्ह्यातील नव्या प्रतिभेचा शोध म्हणून परिश्रमपूर्वक घेतलेले नवोदित कवींचे संमेलन, 'ओवी ते लावणी' हा सुरेल, संगीतमय अनोखा कार्यक्रम अशी विविधता होती.

संमेलनात 'आठवणीतल्या व साठवणीतल्या' अंबरनाथला शब्दांकित करणारी स्मरणिकाही प्रकाशित झाली.

अंबरनाथमध्ये परिषदेच्याद्वारा साहित्य चळवळ उभी करणारे अरुण मैड व प्रा. रेखा मैड यांनी परिश्रमपूर्वक ह्या संमेलनाची धुरा वाहिली. शाखेचे सर्व पदाधिकारी व संयोजक यांच्या सहकार्याने हे संमेलन यशस्वी झाले.

**हरिश्चंद्र खळे,** अंबरनाथ शाखा

## भिवंडी शाखा : उद्घाटन समारंभ

म.सा.प. पुणे यांच्या भिवंडी शाखेचे उद्घाटन दि. ६ मे २००१ रोजी झाले. उद्घाटन प्रसिद्ध विचारवंत, लेखिका व अ. भा. मराठी साहित्य महामंडळाच्या अध्यक्षा तसेच मसापच्या उपाध्यक्षा सौ. वसुंधरा पेंडसे-नाईक यांच्या हस्ते झाला. अध्यक्षस्थान प्रख्यात समीक्षक व भाषातज्ञ, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी भूषविले होते.

कार्यक्रमाची सुरुवात सरस्वती वंदनेने झाली. महाराष्ट्र साहित्य परिषदेची शाखा भिवंडी येथे सुरूकरण्याचा हेतू भिवंडी शाखेचे अध्यक्ष डॉ. व. कृ. अभ्यंकर यांनी सांगितला. यानंतर ठाणे जिल्ह्याचे प्रतिनिधी व मसापचे कार्यकारिणी सभासद श्री. प्रभाकर संत यांनी आपल्या भाषणात म.सा.प.ची भिवंडी शाखा कशी व कोणत्या उद्देशाने सुरू केली, याची माहिती दिली. श्री. संतांनी केवळ तीन दिवसांत भिवंडीतून ७५ आजीव सभासद केले आणि केवळ त्यांच्या प्रयत्नांमुळेच म.सा.प. (पुणे) यांची भिवंडी शाखा सुरू झाली.

श्रीमती वसुंधरा पेंडसे-नाईक यांचा परिचय म.सा.प. भिवंडीच्या उपाध्यक्षा सौ. सई जाधव यांनी करून दिला. तर डॉ. गं. ना. जोगळेकर व श्री. प्रभाकर संत यांचा परिचय श्री. सुधीर घनवटकर यांनी करून दिला.

यानंतर वसुंधरा पेंडसे-नाईक यांच्या हस्ते दीपप्रज्वलन झाले आणि भिवंडी शाखेचे उद्घाटन झाल्याचे त्यांनी जाहीर केले. वसुंधराताई 'स्त्रीवाद' या विषयावर अतिशय मार्मिकपणे बोलल्या. अतिशय मुद्देसूद आणि समर्पक भाषेत त्यांनी 'स्त्री मुक्ती'चा अर्थ समजावून सांगितला.

वसुंधराताईंच्या भाषणानंतर कार्यक्रमा अध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे व्याख्या झाले. मराठी भाषेची होणारी अधोगती, त्याची कारणे, त्याला जबाबदार कोण याविषयी डॉ. गं. ना. जोगळेकर अप्रतिम व सडेतोड बोलले. "आता मात्र मराठी येतच नाही. आणि इंग्रजी पाठ्यपुस्तकापलिकडे जात नाही. याला जबाबदार कोण?" याचा विचार आम्ही सर्वांनीच करायला हवा.

डॉ. गं. ना. जोगळेकरांचे विचार ठाशीव, आग्रही आणि विचार करायला लावणारे होते.

शेवटी म.सा.प.शाखेच्या कार्याध्यक्षा सौ. जयश्री धामणकर यांनी सर्व पाहुण्यांचे व रसिक श्रोत्यांचे आभार मानले. पसायदान झाल्यानंतर कार्यक्रम संपला. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यवाह सौ. निर्मला लाहोटी व सौ. प्रज्ञा जोशी यांनी केले. ■

अनुक्रमणिका



Maharashtra Sahitya Patrika Quarterly October-November-December 2001.
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57

प्रति,

प्रेषक : प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,** टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

